







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

मराठी अभ्यास परिषद



मराठी अभ्यास परिषद पत्रिका

वर्ष ३० । अंक ४ । दिवाळी २०१२ । बोली विशेषांक

# भाषा आणि जीवन

धरत्रीच्या कुशीमधीं
बीयबियानं निजलीं
वऱ्हे पसरली माटी
जशी शाल पाघरली

बीय टरारे भुईंत
सर्वे कोंब आले वऱ्हे
गह्यरलं शेत जसं
आंगावरती शहारे

ऊन वाऱ्याशीं खेयतां
एका एका कोंबांतून
पर्गटले दोन पानं
जसे हात जोडीसन

–बहिणाई (बहिणाबाई चौधरी)



अनुक्रमणिका

**संपादक :** नीलिमा गुंडी
**संपादकीय-सल्लागार :** अशोक रा० केळकर, मॅक्सीन बर्नसन, आशा मुंडले
**संपादन-समिती :** नीलिमा गुंडी (प्रमुख), प्र०ना० परांजपे, मृणालिनी शहा, विजय पाध्ये, आनंद काटीकर
**संपादकीय पत्रव्यवहार :** नीलिमा गुंडी, 3, अन्नपूर्णा, 1259, शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे 411 002. संपर्क : (020) 2448 6015 ई-पत्ता : nmgundi@gmail.com
**प्रकाशक, मुद्रक, व्यवस्थापकीय पत्रव्यवहार व वर्गणी पाठविण्यासाठी पत्ता :** आनंद काटीकर, द्वारा मृणालिनी शहा, 1, शीतल अपार्टमेंट्स, 46/4, एरंडवणे, पुणे 411 004.
चलभाष : 094216 10704
**मुद्रण-स्थळ :** भंडारी मुद्रणालय, सिंहगड मार्ग, पुणे 411 051. स्थिरभाष : (020) 2434 8756

---

मराठी अभ्यास परिषदेच्या www.marathiabhyasparishad.com या संकेतस्थळाचे व्यवस्थापक : **चित्तरंजन भट** - 093731 04093 **विजय पाध्ये** - 098220 31963.
marathi.abhyas.parishad@gmail.com या ई-पत्त्यावर पत्रव्यवहाराचे स्वागत आहे.

---

(१) **वार्षिक वर्गणी** - 

| | एक वर्ष | तीन वर्षे | पाच वर्षे |
|---|---|---|---|
| **व्यक्ती :** | **₹ १५०/-** | **₹ ४००/-** | **₹ ७००/-** |
| **संस्था :** | **₹ २००/-** | **₹ ५५०/-** | **₹ ९००/-** |

सुट्या अंकाची किंमत ₹ ४०/- (कोणत्याही अंकापासून वर्गणीदार होता येते.)

(२) मराठी अभ्यास परिषदेचे **आजीव सदस्यत्व (फक्त व्यक्तींसाठी) शुल्क ₹ २,०००/- + नोंदणी शुल्क ₹ १००/-.** आजीव सदस्यांना 'पत्रिके'चा अंक पाठवला जातो.

(३) **पैसे भरण्याबद्दल सूचना :** वर्गणी प्रत्यक्ष, रोखीने, किंवा धनादेशाने देता येईल. वर्गणी भरण्याचा सोपा मार्ग म्हणजे महाराष्ट्र बँकेच्या कुठल्याही शाखेत मराठी अभ्यास परिषदेच्या (टिळक मार्ग शाखा, पुणे) **बचत खाते क्र० 20057164260** या खात्यात वर्गणी भरणे व आमच्याकडे पैसे भरल्याचे चलन पाठवणे. चलनावर स्वतःचे नाव, पत्ता लिहिण्यास व चलनाची छायाप्रत स्वतःकडे ठेवण्यास विसरू नये. **कृपया मनिऑर्डर पाठवू नये. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास आणि 'ॲट पार' नसल्यास रकमेत ₹ ५०/- वटणावळ अधिक घालावी.** धनादेशासोबत आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी वर्गणी ते अवश्य लिहावे.

(४) **जाहिरातीचे दर :** पूर्ण पान **₹ २,५००/-**, अर्धे पान **₹ १,५००/-**, पाव पान **₹ ८००/-** शुभेच्छा **₹ ४००/-**, आवरण पृष्ठ तीन **₹ ३,०००/-** जाहिरात मराठीत असल्यास उत्तम हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

---

**प्रकाशन : त्रैमासिक;** जानेवारी(हिवाळा), एप्रिल(उन्हाळा), जुलै(पावसाळा), ऑक्टोबर(दिवाळी).
**सूचना :** (१) पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही. (२) **या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाचे अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी साहित्य संस्कृती मंडळ व राज्यशासन सहमत असतीलच असे नाही.** **या अंकाचे मूल्य ₹ ५०/**

अनुक्रमणिका

## अनुक्रमणिका

## लेखकांसाठी सूचना

'भाषा आणि जीवन'मध्ये प्रकाशित करण्यासाठी लेखन पाठवताना त्यासोबत इतर कोणत्याही ठिकाणी (नियतकालिक, जर्नल्स, स्मरणिका वगैरे) सदर लेखन प्रकाशित झालेले नाही, असे लेखकाने स्पष्ट निवेदन करणे आवश्यक आहे. लेखनाचे टंकन संगणकाचा उपयोग करून केलेले असल्यास उत्तम, कोणतेही सॉफ्टवेअर वापरून टंकन केलेले असो, लेखन ई-टपालाद्वारे पाठवताना त्यासोबत टंकनकामात ज्या टंकांचा वापर केलेला असेल ते टंक व संपूर्ण लेखनाची एक पीडीएफ स्वरूपात तयार केलेली प्रत पाठवावी.

'भाषा आणि जीवन'मध्ये प्रसिद्ध करण्यासाठी लेखन पाठविल्यानंतर संपादकांची अनुमती घेतल्याखेरीज ते इतरत्र प्रकाशित करण्यासाठी देऊ नये.

---

## वर्गणीदारांसाठी सूचना

'भाषा आणि जीवन'ची वर्गणी ई-बँकिंग सुविधा वापरूनदेखील पाठविता येईल. इच्छुक वर्गणीदारांनी बँक ऑफ महाराष्ट्र, टिळक रस्ता शाखा, पुणे येथील मराठी अभ्यास परिषदेच्या बचत खाते क्र० 20057164260 ह्या खात्यावर वर्गणीची रक्कम जमा करावी व व्यवहार पूर्ण केल्यानंतर परिषदेकडे पत्राद्वारे वा ई-टपालाने व्यवस्थापकांच्या पत्त्यावर शक्य तितक्या लवकर वर्गणीदाराचे संपूर्ण नाव, टपाल-पत्ता, स्थिरभाष क्रमांक, चलभाष क्रमांक, वर्गणी कोणत्या अंकापासून घेतली जावी त्याबाबत व भरणा केलेल्या रकमेचे तपशील कळवावेत.

---

• 'भाषा आणि जीवन'च्या सर्व वाचक-लेखकांना दिवाळीच्या शुभेच्छा ! •

---

**मुखपृष्ठाविषयी :**
मुखपृष्ठावरील ओळींचा संदर्भ : 'देव अजब गारोडी' - कवयित्री बहिणाई (बहिणाबाई चौधरी) 'कविता विसाव्या शतकाची', संपा०. शान्ता शेळके व इतर, उत्कर्ष प्रकाशन, पुणे, आवृत्ती २०००, पृ० ८३-८४

---

# बोलींच्या अभ्यासाचे महत्त्व

नीलिमा गुंडी

मराठीच्या नांदत्या विश्वात तिच्या बोलींच्या आवाजांनाही महत्त्वाचे स्थान आहे. त्यामुळे मराठी भाषेच्या विकासाचा विचार करताना मराठीच्या बोलींचा विचार करणेही आवश्यक ठरते. साधारणपणे १९८०च्या दशकात मराठी साहित्यात एक स्थित्यंतर घडायला सुरुवात झाली. साक्षरतेच्या प्रसारामुळे साहित्यव्यवहारात एरव्ही परिघावर असणारा नवशिक्षित समाज वाचनसंस्कृतीच्या केंद्राच्या दिशेने सरकू लागला. त्यामुळे मराठी साहित्यातील सामाजिक चित्रणाचा पोत बदलला. तसेच भाषेचे वळणही बदलू लागले. किंबहुना समाजाचा बोलींविषयीचा पूर्वग्रहदूषित दृष्टिकोनही बदलू लागला. भाषावैज्ञानिकांनी रुजवलेला भाषेविषयीचा निकोप असा शास्त्रीय दृष्टिकोनदेखील या स्थित्यंतरामागे कार्यरत होता. शालेय पाठ्यपुस्तकांमध्ये बोलींमधील गद्यपद्य वेचे सन्मानाने स्थान मिळवू लागले. साहित्यातील जीवनदर्शनाच्या सखोलतेचे मूल्यमापन करताना बोलींच्या योजकतेतील अर्थपूर्णता विचारात घेतली जाऊ लागली. केवळ 'चूष' म्हणून वापरलेला 'भाषिक रुचिपालट', असे या स्थित्यंतराचे स्वरूप नव्हते. त्यामागे मराठीच्या सांस्कृतिक संपन्नतेचा ठरावीक नकाशा बदलण्याची भूमिका होती. महाराष्ट्राच्या चतुःसीमेतील ग्रामीण भागांतूनही मराठी साहित्यात सर्जनाचे धुमारे फुटू लागले होते. इतकेच नव्हे, तर सामाजिक स्थिरतेचा पाया नसलेले समाजघटकही आपले जीवनानुभव थेटपणे सांगत साहित्यात पाय रोवू लागले होते.

या स्थित्यंतराचे उदाहरण म्हणून भटक्या समाजाच्या कैकाडी बोलीचा अर्थवाही वापर करून लिहिल्या गेलेल्या लक्ष्मण माने यांच्या 'उपरा'(१९८०) या आत्मचरित्राचा उल्लेख करणे योग्य होईल. डॉ० अशोक केळकर यांनी आपल्या 'उपरी भाषा आणि थलकरी भाषा' या लेखात या पुस्तकामागील स्थित्यंतराची नेमकी मीमांसा केली आहे. [१] 'भाषेचा टीपकागद हा बराच चोख असतो' असे म्हणत त्यांनी त्या टीपकागदावर उमटलेल्या खुणा बारकाईने लक्षात आणून दिल्या आहेत.

आशयाच्या मागणीनुसार साहित्यकलाकृतीत कधी बोलींचे कलात्मकरीत्या उपयोजन करणे, तर कधी बोलींमधूनच संपूर्ण कलाकृती लिहिणे; ही रीत हळूहळू मोठ्या प्रमाणावर अनुसरली गेलेली दिसत आहे. त्याची काही उदाहरणे देता येतील. पुरुषोत्तम बोरकर यांच्या 'मेड इन इंडिया' (१९८७) या कादंबरीतील वऱ्हाडी बोलीचे उपयोजन प्रशंसनीय





अनुक्रमणिका

ठरले होते. कविता महाजन यांच्या 'ब्र' (२००५) या कादंबरीचाही आवर्जून उल्लेख करावयास हवा. या कादंबरीची नायिका प्रफुल्ला ही महाराष्ट्रातील ४७ आदिवासी जमातींचा अभ्यास करण्यासाठी प्रवास करते. साहजिकच या कादंबरीत ठाकर, महादेव कोळी, कातकरी, वारली, गोंड माडिया अशा अनेक जमातींच्या बोलींतील शब्दसंपत्ती, लोकगीते यांचा कलात्मक उपयोग समूहमन वाचण्यासाठी करण्यात आला आहे. तसेच भालचंद्र नेमाडे यांच्या 'हिंदू' (२०१०) या कादंबरीत विविध बोलींची केलेली आशयानुरूप योजना कादंबरीच्या अर्थवत्तेत भर घालणारी ठरली आहे.

कोंकणी, मालवणी, वऱ्हाडी या बोलींबरोबरच झाडी, अहिराणी या बोलींमधूनही अलीकडे लेखन केले जात आहे. उदा० 'सपनधून' - ना०जो० थुटे (झाडीबोलीतील कवितासंग्रह), 'आदिम तालने संगीत' - सुधीर देवरे (अहिराणी बोलीतील कवितासंग्रह) भुजंग मेश्राम यांच्या 'उलगुलान' (१९९०) या कवितासंग्रहामध्ये तर आदिवासींच्या गोंडी, गोरमाटी, परधानी इत्यादी अनेक बोलींमधील कविता समाविष्ट आहेत. येथे काही मोजकीच उदाहरणे दिली असली तरी प्रत्यक्षात अशा लेखनाची व्याप्ती खूपच वाढली आहे. जागतिकीकरणाच्या रेट्यात स्वत:चे असे खास वर्तुळ आणि त्याचा सामाजिक वारसा जपण्याचा प्रयत्न, म्हणूनही या लेखनाकडे पाहिले पाहिजे. मात्र अशा लेखनाची वर्णनात्मक सूची तयार करणे, या लेखनाची सातत्याने समीक्षा होणे, हेही गरजेचे आहे.

वाङ्मयीन स्थित्यंतरात प्रभावी घटक म्हणून भूमिका बजावणाऱ्या बोलींबाबत समाजातील मान्यवरांनाही पुरेशी शास्त्रीय माहिती कशी नसते, याचे एक उदाहरण देण्याजोगे आहे. डॉ० नरेंद्र जाधव यांच्या 'आमचा बाप आन् आम्ही'[२] (१९९३) या पुस्तकाच्या प्रकाशन समारंभाच्या वेळचा प्रसंग त्यांनी आपल्या पुस्तकाच्या पुढील आवृत्तीत वर्णन केला आहे. त्यांच्या पुस्तकाच्या प्रकाशन समारंभात विजय तेंडुलकर यांनी त्यातील एक प्रकरण वाचून दाखवले. त्या वेळी त्यांचे वाचन ऐकून अस्वस्थ झालेल्या डॉ० जाधव यांनी शेवटी न राहवून म्हटले, 'तेंडुलकरांनी उत्तम वाचले. मात्र त्यांनी ते सातारा-कोल्हापूरच्या तमाशाप्रधान मराठी चित्रपटातल्या बोलीभाषेच्या ढंगानं वाचलं. या पुस्तकातली बोलीभाषा आहे ती नाशिकची आहे. तिला स्वत:चा बाज आहे. त्या बोलीभाषेची प्रतारणा होता कामा नये.' असे म्हणून त्यांनी स्वतः पुन्हा त्यातील काही प्रसंग खास नाशिकच्या गावरान बोलीत सादर केले! हे सांगायचा उद्देश असा की बोलींमधील सूक्ष्म असे प्रादेशिक भेद आणि त्यातील हेल याविषयी सुशिक्षित समाजाला फारशी माहिती नसते. बोलींच्या अभ्यासाविषयी आस्था कमी असल्यामुळे असे घडते.

सर जॉर्ज ग्रियर्सन यांनी इ०स० १८९४ ते १९२८ या कालखंडात भारतीय भाषांच्या सर्वेक्षणाचा बृहद्प्रकल्प पूर्ण केला होता. त्यात मराठीच्या बोलींनाही स्थान होते. ग्रियर्सन यांनी संगृहीत केलेले मराठी बोलींचे नमुने 'मराठी संशोधन पत्रिका'मध्ये

प्रकाशित झाले आहेत.[३] त्यात मराठीच्या बोलींचे ७२ नमुने आहेत. बायबलमधील उधळ्या मुलाची गोष्ट त्यात नमुनादाखल घेतली आहे. मराठीच्या ३९ बोलींचे प्रादेशिक उपभेद दर्शवणारे नमुनेही त्यात आहेत. उदाहरणार्थ :

(१) कुणबी बोली - १ नमुना क्र० १० - मुंबई
२ नमुना क्र० ११ - ठाणे जिल्हा
३ नमुना क्र० १२ - पुणे जिल्हा.

ग्रियर्सन यांनी मध्यप्रदेशातील काही भाग, डांग संस्थान, बस्तर संस्थान येथील बोलींचे नमुने दिले होते. तसेच त्यांनी अहिराणी व डांगी बोलींना गुजरातीच्या बोली मानले होते. त्यांचे काही निष्कर्ष वादग्रस्त ठरले. आज अहिराणी ही मराठीची बोली मानली जाते. तसेच त्यांनी तत्कालीन निजाम संस्थान म्हणजे आजचा मराठवाडा सर्वेक्षणात समाविष्ट केला नव्हता. अशा त्रुटी असूनही त्या सर्वेक्षणातून समोर येणारे चित्र पायाभूत मानावे लागते. अर्थात आज इतक्या वर्षांनंतर चित्र बदलले असणार. ग्रियर्सननंतर बोलींच्या शास्त्रीय सर्वेक्षणाचा प्रयत्न १९६२मध्ये डॉ० अ०मा० घाटगे यांच्या मार्गदर्शनाखाली सुरू झाला. तसेच डॉ० शं०गो० तुळपुळे यांच्या पुढाकाराने शब्दभूगोलाच्या तत्त्वावर आधारित बोलींचा शब्दकोश तयार करण्याचाही प्रकल्प हाती घेण्यात आला. पण हे दोन्ही प्रयत्न पूर्णपणे सफल झाले नाहीत. या संदर्भात अभिप्राय देताना बोलींचे अभ्यासक सु०बा० कुळकर्णी लिहितात की या संशोधनकार्यात एकसूत्रीपणाचा व नियोजनाचा अभाव होता.[४] अलीकडे नव्याने संशोधनप्रकल्पाचे काम सुरू झाले आहे, ही समाधानाची बाब आहे.

डेक्कन महाविद्यालयाचे भूतपूर्व संचालक सु०मं० कत्रे यांच्या 'भाषाप्रकल्पां'मुळे बोलींच्या संशोधनाला चालना मिळाली होती. त्यामुळे काही बोलींचा शास्त्रीय अभ्यास प्रबंधरूपाने सिद्धही झाला. परंतु ते प्रबंध इंग्रजीतून सादर झाल्यामुळे त्यांचा मराठी वाचकांना लाभ झाला नाही. अलीकडे काही बोलींचा शास्त्रीय अभ्यास मराठीत ग्रंथरूपाने प्रकाशित होऊ लागला आहे. (उदा० 'झाडी बोली : भाषा आणि साहित्य' (१९८८) : डॉ० हरिश्चंद्र बोरकर.) पण आजही अनेक बोली अभ्यासकांच्या प्रतीक्षेत आहेत.

एकंदरीत, बोलींचा भाषावैज्ञानिक, तसेच वाङ्मयीन व सांस्कृतिक अंगाने चिकित्सक अभ्यास होणे नितांत आवश्यक आहे. तेव्हा आधुनिक तंत्रज्ञानाच्या साहाय्याने बोलींचे संशोधन, संकलन, जतन व संवर्धन करणे आणि बोलींचे प्रमाण मराठीशी असलेले नाते दृढ राखणे, हे आपले केवळ भाषिक नव्हे तर सामाजिक कर्तव्य ठरते. सर्वेक्षण, संशोधन, व्याकरण, शब्दकोश, कलात्मक उपयोजन आदी पद्धतीने होणाऱ्या बोलींच्या अभ्यासाचा वेध घेणारा, 'भाषा आणि जीवन'चा बोली विशेषांक काढण्यामागे हेच प्रयोजन आहे.



अनुक्रमणिका

**संदर्भसूची**

१. डॉ० केळकर, अशोक, 'उपरी भाषा आणि थलकरी भाषा', भाषा आणि जीवन (व० २, अं० ४) दिवाळी, १९८४, पृ० ४२-४७.

२. डॉ० जाधव, नरेंद्र, 'आमचा बाप आन् आम्ही'ची अकरा वर्षे', 'आमचा बाप आन् आम्ही', ग्रंथाली, मुंबई, विस्तारित डीलक्स आवृत्ती, मुंबई, २००५ पृ० एक ते चोवीस.

३. --, मराठी बोलींचे नमुने', मराठी संशोधन पत्रिका, (व० ११), मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, मुंबई, (सनाचा उल्लेख नाही.)

४. कुळकर्णी, सु०बा०, 'बोलीभाषांचा अभ्यास', 'भाषा व साहित्य : संशोधन' (खंड १), संपादक डॉ० वसंत स० जोशी, महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे, १९८१, पृ० ६९-१२३. ■

## मराठीची अवहेलना का?

मराठी भाषेचा सर्वानुमते सर्वांत परिपूर्ण कोश हा दाते-कर्वे कोश असं मानलं जातं. ह्या कोशाचे पुरवणीसहित आठ भाग आहेत. ह्या सर्व भागांची मिळून शब्दसंख्या १,३०,६७० आहे असं संपादकांनी नमूद केलं आहे. त्याची पहिली आवृत्ती १९३२ सालची आहे. शेवटचा भाग १९३८ साली प्रसिद्ध झाला. त्याची यथामूल पुनर्मुद्रित आवृत्ती, जिला नवी आवृत्ती म्हटले आहे, ते वस्तुत: प्रशंसनीय पुनर्मुद्रण आहे. त्यानंतरची ह्याची आवृत्ती नाही. १९३२पासून २०१२पर्यंतच्या ऐंशी वर्षांत एकतर मराठीच्या शब्दसंपत्तीत नोंद घ्यावी अशी भर पडली नाही किंवा त्या भाषेच्या शब्दसंपत्तीचं कमालीचं अवमूल्यन झाल्यामुळे तिची किंमत उरली नाही ह्या दोन्हींपैकी एक तरी सत्य आहे (किंवा कदाचित दोन्ही सत्य आहेत) हे म्हटल्याखेरीज इलाज नाही.

आजही तब्बल ऐंशी वर्षांनी ह्या समग्र कोशाला पर्याय नाही आणि त्याच्या नुसत्या पुनरावृत्त्या निघत आहेत ह्या इतकी शरमेची गोष्ट नाही. महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यापासून त्यात मराठी भाषेचे मौलिक स्वरूपाचे एकभाषिक किंवा द्वैभाषिक कोश झाले नाहीत. एखाददुसरा मौलिक अपवाद सोडता आधुनिक भाषाशास्त्राचा वापर भाषाप्रसाराकरता करून लिहिलेली भाषाशिक्षणाची पुस्तके आणि वेबसाईट्स झाल्या नाहीत. मराठीचं स्वराज्य आल्यावरच तिची अवहेलना का व्हावी?

अरुण खोपकर, 'आपले वाङ्मय वृत्त', फेब्रुवारी २०१२, पृ० ५

# बोलींचे स्वरूप

कल्याण काळे

## बोली आणि भाषा

बोली आणि भाषा हे दोन्ही शब्द व्युत्पत्तीच्या दृष्टीने समानार्थकच आहेत. 'बोलली जाते ती' असाच या दोन्ही शब्दांचा अर्थ आहे. पण प्रत्यक्ष व्यवहारात या दोहोंच्या अर्थामध्ये फरक केला जातो. भाषा हा शब्द एका विस्तीर्ण भूप्रदेशात वास्तव्य करून असलेल्या मोठ्या जनसमूहाच्या संप्रेषण-माध्यमाला दिलेले समाईक नाव आहे. त्या भाषेने व्यापलेल्या भूप्रदेशाचे अनेक विभाग निर्माण झालेले असतात. त्या विभागात राहणारे लोक बराच काळ इतर विभागांतील लोकांपासून दूर राहिल्यामुळे त्यांच्या भाषेतही फरक पडत जातो. अशा तऱ्हेने परस्पर संवादाच्या अभावी त्या सामुदायिक भाषेमध्येही भेद निर्माण होतात. या भेदांनाच 'बोली' असे म्हणतात. भाषा ही सर्व बोलींना व्यापून असणारी संज्ञा आहे, तर 'बोली' ही त्या भाषेच्या अंतर्गत निर्माण झालेल्या भिन्न भिन्न भाषाभेदांसाठी वापरण्यात येणारी संज्ञा आहे. 'भाषा' हे या बोलींच्या समूहाला दिलेले नाव असून 'बोली' हे त्यातील उपभेदांना दिलेले नाव आहे.

त्यात भाषा ही प्रत्यक्षात बोलली जात नाही. बोलण्याचे सर्व व्यवहार कोणत्या तरी बोलीतच होत असतात. भाषेचा आविष्कार बोलीद्वारेच होतो. भाषाविज्ञानातील स्वनिम आणि स्वनांतर यांच्यामध्ये जे नाते असते, ते भाषा आणि बोली यांच्यामध्येही असते. असे असले तरी बऱ्याच वेळा बोलीचा सुद्धा भाषा म्हणून उल्लेख होताना आढळतो. उदा० नागपुरी भाषा, अहिराणी भाषा इ०

## बोलींचे प्रकार

एखाद्या विशाल जनसमूहाच्या भाषेमध्ये अनेक कारणांनी उपभेद निर्माण होतात. तेच बोलींचे प्रकार होत. भूप्रदेशांच्या भेदांमुळे निर्माण झालेल्या बोलींना प्रादेशिक बोली म्हणतात. उदा० नागपुरी बोली, अहिराणी बोली, कोकणी बोली इ० तर समाजातील वर्गभेद, वर्णभेद, व्यवसायभेद याप्रमाणे परस्परांपासून दुरावलेल्या समाजाच्या बोलीतही फरक पडत जातो. त्यातून सामाजिक बोली निर्माण होतात. उदा० चित्पावनी बोली, पांढरपेशी बोली, झोपडपट्टीची बोली. सीमा प्रदेशात दोन भिन्न भाषांच्या संपर्कातून निर्माण झालेल्या बोलींना संकरित बोली म्हणतात.



अनुक्रमणिका

**क्षेत्रीय बोली**

या भेदांखेरीज दुसरेही भेद भाषेत निर्माण होतात. वरील प्रकारचे बोलीभेद त्या त्या समाजाचे वा प्रदेशाचे स्थिर उपभेद आहेत. त्यात सहसा बदल होत नाहीत. पण समाज जीवनात अनेक प्रकारचे क्षेत्रभेद असतात. कुटुंब, बाजारहाट, रुग्णालये, धर्मस्थळे, शिक्षणकेंद्रे, क्रीडाप्रकार इ० त्या त्या क्षेत्रात वापरायच्या भिन्न भिन्न परिभाषा तयार झालेल्या असतात. एकच व्यक्ती या सर्व क्षेत्रांतून वावरू शकते. त्यानुसार ती व्यक्ती त्या त्या क्षेत्रातील भाषा वापरत असते. उदा० क्रिकेटचा खेळ चालू असताना किकेटची परिभाषा वापरते; रेल्वे स्थानकावर तेथील विशिष्ट शब्दांचा प्रयोग ती करते, तर हॉस्पिटलमध्ये तेथील रूढ शब्दांचा प्रयोग ती करते. याचा अर्थ एकच व्यक्ती प्रसंगानुरूप वेगवेगळ्या क्षेत्रीय बोली वापरू शकते. या क्षेत्रीय बोलींचा वापर फक्त त्या क्षेत्रापुरताच मर्यादित असतो. क्षेत्र बदलले की क्षेत्रीय बोलीही बदलते. या क्षेत्रीय बोलींना 'रजिस्टर' किंवा 'क्षेत्रीय परिभाषा' असे म्हणतात. बोलींचे असे अनेक प्रकार असले तरी प्रस्तुत लेखात प्रादेशिक बोलींचाच विचार प्रस्तुत आहे. सामाजिक बोली, संकरबोली, क्षेत्रीय बोली इ०चा विचार समाजभाषाविज्ञान या स्वतंत्र अभ्यास-विषयात केला जात असतो.

**बोली-भूगोल**

प्रादेशिक बोलींमधील भेदांचा अभ्यास करणाऱ्या विद्याशाखेस 'बोली भूगोल' असे म्हणतात. त्यालाच 'भाषिक भूगोल' असेही म्हणतात. भाषिक भूगोल या विषयान्तर्गत राष्ट्रातील भिन्न भिन्न भाषांमधील एककालिक भेदांचा अभ्यास केला जातो. तर बोली भूगोलात एका भाषेतील भिन्न भिन्न बोलींच्या एककालिक भेदांचा अभ्यास केला जात असतो. ग्रियर्सनच्या 'ए लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' या बृहद् प्रकल्पामध्ये भाषाभेदांचा अभ्यास आणि बोलीभेदांचा अभ्यास असे दोन्ही अभ्यास समाविष्ट झाले आहेत. हे दोन्ही अभ्यास प्रादेशिक भेदांवरच आधारलेले आहेत.

**भाषेचा ऐतिहासिक अभ्यास**

भाषेच्या कालिक भेदांचाही अभ्यास होऊ शकतो. त्यालाच भाषेचा ऐतिहासिक अभ्यास असे म्हणतात. हा अभ्यासही तुलनात्मकच असतो. या अभ्यासात भाषांची कालिक परिवर्तने, त्यांचे नियम, त्या नियमांच्या आधाराने पूर्व भाषांचा शोध, त्यांची पुनर्निर्मिती, भाषांचे वंशवृक्ष निर्माण करणे, भाषांची कुळे निश्चित करणे. इ० विषयांचा अभ्यास होतो. संबंध एकोणिसावे शतक हे या ऐतिहासिक तौलनिक अभ्यासाचे सुवर्णयुगच म्हणावे लागेल. या क्षेत्रात रास्मुस रास्क, बॉप, ग्रिम, व्हेर्नर, श्लायशर इ० अभ्यासकांची कामगिरी मोलाची आहे. या अभ्यासकांच्या परिश्रमांमुळे भाषापरिवर्तनाचे नियम निश्चित झाले. जर्मनीतील नव्य वैयाकरणांनी उत्साहाच्या भरात ध्वनिपरिवर्तनाचे नियम नियमित आणि निरपवाद असतात असे सांगायला सुरुवात केली. हेरमान पॉल, कार्ल ब्रुगमान,

हेरमान ऑस्टहॉफ हे या नव्य वैयाकरणांपैकीच होत.

**बोलींचा अभ्यास**

एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात युरोपीय अभ्यासकांचे बोलींच्या अभ्यासाकडे लक्ष वेधले गेले. काही अभ्यासकांना जगातील काही बोली नष्ट होत आहेत, असे लक्षात आले. तेव्हा त्या पूर्णपणे नष्ट होण्यापूर्वीच त्यांचे व्याकरण, त्यांचे कोश तयार करण्याचा उद्योग त्यांनी सुरू केला. तो करत असताना बोलींच्या ध्वनिपरिवर्तनाचे नियम निरपवाद असतात, या नव्य वैयाकरणांच्या सिद्धान्ताबद्दल त्यांच्या मनात संशय निर्माण झाला. त्यांच्या संशोधनांतून त्या नियमांना छेद देणारी अनेक उदाहरणे त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आली. तेव्हा नव्य वैयाकरणांच्या सिद्धान्तांना आव्हान देण्यासाठी त्यांनी आपल्या अभ्यासाचे क्षेत्र अधिक सखोल आणि व्यापक करून अधिकाधिक पुरावे गोळा करण्यावर आपले लक्ष केंद्रित केले. त्यांच्या प्रयत्नातून बोलींच्या अभ्यासाचे मोठमोठे प्रकल्प उभे राहिले. आणि बोलींच्या अभ्यासाचे क्षेत्र समृद्ध झाले.

**प्रादेशिक बोली आणि प्रमाण बोली**

एखाद्या प्रदेशात बोलल्या जाणाऱ्या अनेक बोलींपैकी एखादी बोली राजकीय, वाङ्मयीन, सांस्कृतिक कारणांनी प्रतिष्ठा पावते, आणि तिला प्रमाण भाषेचा दर्जा प्राप्त होतो. सर्व औपचारिक व्यवहारात तिचाच वापर केला जातो. शिक्षण, न्यायालय, शासकीय कार्यालये, प्रसारमाध्यमे यातून तिचाच वापर होतो. तिला मिळालेल्या महत्त्वामुळे प्रदेशातील सर्व उपप्रदेशांत तिचा प्रचार होतो. आणि त्या प्रदेशांतील बोलीच्या जोडीने तिचा वापर होऊ लागतो. निरनिराळ्या उपप्रदेशांत निरनिराळ्या प्रादेशिक बोली बोलल्या जात असल्या तरी सर्व औपचारिक व्यवहारासाठी प्रमाण बोलीचाच स्वीकार केला जातो. त्यामुळे प्रमाण बोली त्या भाषेच्या सर्व उपप्रदेशांतील लोकांना समजते. पण बोली मात्र आपल्या आपल्या मर्यादित क्षेत्रातच बोलल्या जातात. त्यामध्ये ज्या बोलींमधले भौगोलिक अंतर कमी, त्या बोलींमध्ये परस्पर आकलनक्षमता अधिक असते. पण ते अंतर जसजसे वाढत जाते, तसतशी आकलनक्षमता कमी होत जाते. मात्र प्रमाण बोली ही तिचा सर्व प्रदेशभर वापर असल्याने सर्वच प्रादेशिक बोलीभाषकांना आकलनक्षम असते. पुढील आकृतीवरून हे अधिक स्पष्ट होईल.

| प्रमाण बोली | | अ | | |
|---|---|---|---|---|
| इतर बोली | क | ख | ग | घ |

वरील आकृतीतील 'क' पासून 'घ' पर्यंतच्या बोलींची 'क'च्या दृष्टीने दुर्बोधता क्रमशः वाढत जाते. पण या चारही बोली 'अ' या प्रमाण बोलीपासून सलगच असल्याने 'अ'

ही बोली या सर्व बोलींना सारखीच आकलनक्षम असते.

**बोलींच्या अभ्यासाची क्षेत्रे**

बोलींचा अभ्यास तीन प्रकारे करण्यात येतो. (१) व्याकरणरचना, (२) कोशरचना आणि (३) तौलनिक अभ्यास. व्याकरणरचना करताना प्रामुख्याने भाषाव्यवस्थेवर (langue) भर दिला जातो. शितावरून भाताची परीक्षा या न्यायाने निवेदकाकडून (informant) प्रश्नावलीच्या साहाय्याने मिळवलेल्या सामग्रीचे विश्लेषण करून तिचे व्याकरण सिद्ध केले जाते. आजपर्यंतचे जी बोलीची व्याकरणे प्रसिद्ध झाली आहेत त्यात एक महत्त्वाची बाब दुर्लक्षिली जाते. भाषेच्या ध्वनिव्यवस्थेचे स्वरूप सांगताना खंडकीय स्वनिमांचाच अभ्यास ढोबळपणे सांगितला जातो. तिचे पराखंडकीय स्वनिम सहसा दिले जात नाहीत. प्रत्येक बोलीचे स्वतंत्र हेल (सुरावली) असतात. हे हेलच भाषेचे एक महत्त्वाचे व्यवच्छेदक लक्षण आहे. तेच लेखनात उतरवणे कठीण आहे. ते ध्वनिफितीच्या साहाय्याने स्पष्ट करणे आवश्यक ठरते. कोशरचनेसाठी भाषेचे जास्तीत जास्त पुरावे गोळा करावे लागतात. त्यासाठी एकदोन निवेदकांवर भागत नाही. त्यासाठी जास्तीत जास्त निवेदकांकडून भाषेचे कानेकोपरे धुंडाळून सामग्री जमवावी लागते. ते काम बरेच जिकीरीचे आणि वेळखाऊ असते. तौलनिक अभ्यासात सीमा निश्चित करणे एक महत्त्वाचे काम आहे. त्यासाठी नकाशावर समानोच्चार दर्शक (isogloss) रेषा निश्चित करून त्या सीमारेषा ठरवाव्या लागतात. त्यांच्या साहाय्याने नकाशे तयार करता येतात. तसेच दोन्ही भाषांच्या संरचना, शब्दसंग्रह, उच्चारणपद्धती, अर्थविचार या सर्वांची छाननी करावी लागते. या सर्वांचा विचार करता बोली अभ्यासाचे क्षेत्र बरेच मोठे आहे. अभ्यासकांना संशोधनासाठी नांगरल्याविण पडीक पडलेली बरीच भुई उपलब्ध आहे. ■

**वाचावे असे काही**

(१) 'मराठीचा बोलु कौतुके...', अमृता गणेश खंडेराव, लोकसत्ता, ३ सप्टेंबर, २०१२

(२) 'मावळत्या सूर्याची साक्ष', उमेश करंदीकर, साप्ताहिक लोकप्रभा, ५ ऑक्टोबर २०१२

(३) 'सेमी-इंग्रजी माध्यम - सुवर्णमध्य की सुवर्णमृग?', वीणा सानेकर, लोकसत्ता, १७ ऑगस्ट २०१२

(४) 'हे शिक्षण आपलं आहे?', मनोहर राईलकर, लोकसत्ता, ४ ऑक्टोबर, २०१२



अनुक्रमणिका

# बोली-संशोधन-प्रकल्प

पुष्पा राजापुरे-तापस

महाराष्ट्र राज्य स्थापनेला पन्नास वर्षे पूर्ण झाल्याच्या निमित्ताने महाराष्ट्र राज्य सरकारने सामाजिक, सांस्कृतिक, भाषिक स्वरूपाच्या विविध योजना हाती घेतल्या असून वेगवेगळ्या राज्यस्तरीय मंडळाकडे कार्यवाहीसाठी सोपविल्या आहेत. त्यापैकी आपापल्या भौगोलिक क्षेत्रामध्ये मोडणाऱ्या जिल्ह्यांतील बोलीभाषांचा 'शब्दकोश' करण्याचे काम 'महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळा'कडे सोपविण्यात आले आहे. महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळाने महाराष्ट्रातील काही विद्यापीठांकडे हे काम सोपविले आहे. या अभ्यासाकरिता प्रत्येकी सहा लाख पंचवीस हजारांचा निधी उपलब्ध करून देण्यात आला आहे. मुंबई विद्यापीठाच्या अखत्यारीत येणाऱ्या सिंधुदुर्ग, रत्नागिरी व रायगड या तीन जिल्ह्यांतील अनुक्रमे मालवणी, बाणकोटी व आगरी या बोलींचा शब्दकोश करण्याचे काम कुलगुरू डॉ० राजन वेळूकर यांनी मराठी विभागाकडे सोपविले आहे आणि मी सदर प्रकल्पाची समन्वयक म्हणून काम पाहात आहे.

बोलींचा शब्दकोश तयार करण्याकरिता क्षेत्रीय संशोधनाची आवश्यकता होती, हे ध्यानात घेऊन विभागाचे माजी विद्यार्थी व विद्यापीठाशी संलग्न महाविद्यालयांतील प्राध्यापक यांना या अभ्यासात सहभागी करून घेण्यात आले. यामध्ये प्रामुख्याने मुंबईत राहूनही दैनंदिन कौटुंबिक व्यवहारात मालवणी बोलणारे, तसेच सिंधुदुर्ग जिल्ह्यातील वेगवेगळ्या महाविद्यालयांत कार्यरत असलेले आणि भाषाविज्ञानाचा किमान परिचय असणारे प्राध्यापक आहेत. त्याचबरोबर सदर शब्दकोशांकरिता कार्यपद्धती ठरविण्यासाठी भाषावैज्ञानिक डॉ० रमेश धोंगडे यांचे मार्गदर्शन घेण्याचे ठरले. त्याकरिता दोन दिवसीय कार्यशाळा आयोजित करण्यात आली. या कार्यशाळेत शब्दकोशाकरिता विविध क्षेत्रांची निवड करून प्रमाणभाषेतील शब्दसंग्रह करण्याचे ठरले. साधारणपणे पंचवीस क्षेत्रांची निवड करण्यात आली. उदाहरणार्थ, घर, घराभोवतालचा परिसर, स्वयंपाकघर, शेती शेतीकामाशी निगडित शब्दव्यवहार, राजकारण, स्त्री-पुरुषांची वेशभूषा इत्यादी. निवडलेल्या क्षेत्राशी निगडित प्रमाणभाषेतील जवळजवळ दोन ते अडीच हजार शब्दसंग्रह तयार करण्यात आला. दर आठवड्याला तीन दिवस दुपारनंतर मुंबईतील प्राध्यापकांनी एकत्र येऊन हा शब्दसंग्रह तयार केला. याकरिता साधारणपणे तीन-चार महिन्यांचा कालावधी लागला. प्रमाणभाषेतील शब्दसंग्रह तयार झाल्यानंतर त्याची योग्यायोग्यता

तपासण्याकरिता पुन्हा एकदा डॉ० धोंगडे यांच्या मार्गदर्शनाखाली तीन दिवसीय कार्यशाळा आयोजित करण्यात आली. या कार्यशाळेत मूळ यादीतील काही शब्द बाद झाले, तर काही नव्या शब्दांची भर पडली. आपण नित्य मराठी बोलत असूनही शब्दसंग्रह करताना सर्व शब्द सहजपणे आठवत नाहीत, यासारख्या अनेक बाबी आम्हां सर्वांच्याच लक्षात आल्या. सर्वांत महत्त्वाचे म्हणजे बोलीच्या शब्दकोशाकरिता निवडलेले शब्द एकवचनातील असायला हवेत, हे शब्दांची यादी करताना अचूकपणे ध्यानात घेतले गेले. अंतिमतः प्रमाण शब्दसंग्रह पूर्ण झाल्यावर क्षेत्रीय संशोधनास जाण्याचे ठरले. महत्त्वाचे म्हणजे डॉ० धोंगडे आणि डॉ० अविनाश पांडे (साहाय्यक प्राध्यापक, भाषाविज्ञान विभाग, मुंबई विद्यापीठ) हे दोघे व त्यांचे विद्यार्थी वगळता आम्हां कोणापाशीच या प्रकारच्या संशोधनाचा अनुभव नव्हता. त्यामुळे बोलीमधील शब्दांची माहिती असलेल्या व्यक्तीस (इन्फॉर्मंट) कसे विश्वासात घ्यावे, त्याला कसे बोलते करावे, प्रकल्पाची माहिती कशी द्यावी व त्याचे महत्त्व कसे पटवावे यांविषयीचेही मार्गदर्शन श्री० धोंगडे यांनी आम्हां सर्वांना केले.

सिंधुदुर्ग जिल्ह्यातील मालवणी बोलीतील शब्दसंग्रह गोळा करण्याकरिता आम्ही ऑक्टोबर २०११मध्ये व डिसेंबर २०११मध्ये मिळून प्रत्येकी आठ-आठ दिवसांचा अभ्यासदौरा आयोजित केला. या अभ्यासदौऱ्यात डॉ० पुष्पलता राजापुरे-तापस (समन्वयक), डॉ० अलका मटकर, डॉ० भारती तेंडुलकर, डॉ० सूर्यकांत आजगांवकर, डॉ० गोविंद काजरेकर, प्रा० भटू वाघ, प्रा० गौतम ब्रह्मे, प्रा० वसंत पानसरे आणि (हंगामी) संशोधन साहाय्यक श्रीमती लता पांचाळ, काही विद्यार्थी व कर्मचारी, आणि मार्गदर्शक डॉ० रमेश धोंगडे सहभागी होते. या सोळा दिवसांमध्ये मिळून आम्ही एकूण बत्तीस गावांना भेटी दिल्या. गावांची निवड करताना निमशहरांपेक्षा खेडेगावांना प्राधान्य देण्यात आले. अक्षरशः आजही जेथे केवळ एकदाच एस०टी० येते व जाते, ज्या डोंगराळ भागात वीज नाही, पाणीही मैल दोन मैल जाऊन आणावे लागते, अशा गावांमध्येही लोकांना भेटलो. अनेक गावांमध्ये मतदान करण्याव्यतिरिक्त राजकारणाशी संबंध नसलेल्या ग्रामस्थांना भेटलो. निमशहरांच्या जवळ असलेल्या, शिक्षकी पेशात असलेल्या, विद्यार्थीदशेत असलेल्या माहितगारांकडून 'राजकारण' या क्षेत्राशी निगडित जे शब्द येत होते ते जवळजवळ प्रमाणभाषेतीलच होते किंवा महानगरांमध्ये त्याकरिता जे इंग्रजी शब्द आपण सर्व वापरतो तेच त्यांनाही ज्ञात होते. त्या शब्दांसाठी त्यांना समानार्थी शब्द बोलीत तयार करण्याची गरज वाटत नसल्याचे दिसले. दुसऱ्या भाषेचा सहजभावाने स्वीकार करण्याचीच ही वृत्ती होती.

शब्दसंग्रह जमविताना ज्याप्रमाणे छोट्याछोट्या कमी लोकसंख्या असलेल्या गावांची निवड करण्यात आली त्याप्रमाणे शक्यतोवर सर्व जातींतील लोकसमूहांना सामावून घेण्यात

आले. सिंधुदुर्ग जिल्ह्यातील सारस्वत ब्राह्मणांची बोली इतर जातींतील समाजापेक्षा वेगळी आहे, असे जवळजवळ प्रत्येक गावात ठामपणे सांगितले जात होते. मात्र प्रत्यक्ष सर्वेक्षणात बोलण्याच्या पद्धतीपेक्षा खूप वेगळे काही आम्हांला सापडले नाही. वेंगुर्ल्यातील व्यक्तीला मालवणातील व्यक्तीपेक्षा आपल्या बोलीत वेगळे शब्द असल्याचे भासते; पण आताच नोंदविल्याप्रमाणे बोलण्याच्या भिन्नभिन्न पद्धतीमुळे बोलणाऱ्याला आपली भाषा वेगळी वाटत आहे, असे लक्षात आले. अपवादात्मक काही शब्द सांगता येतील; पण ते आताच येथे देणे यथोचित ठरणार नाही, कारण आमच्याकडून हा अभ्यास अजून पूर्ण व्हावयाचा आहे.

सर्वेक्षणाकरिता आम्ही 'इन्फॉर्मंट'चे वयोगटही निश्चित केले होते. उदाहरणार्थ, अठरा ते चाळीस, चाळीस ते साठ आणि साठपासून पुढे. तसेच स्त्री-पुरुष ह्या दोघांचाही सहभाग सारख्याच प्रमाणात राहील असेही पाहिले. त्याचबरोबर देवगड, मातोड व रेड्डी या भागांतील तीन शाळांमध्ये सर्वेक्षण करण्यात आले. इयत्ता नववीतील मुलामुलींना यात सहभागी करून घेण्यात आले. शाळेच्या मुख्याध्यापकांनी व विद्यार्थ्यांनी आमच्या स्मरणात राहील असे सहकार्य आम्हांला केले. गावागावांतील ही शाळकरी मुले आपल्या बोलीचा वापर कितपत करीत आहेत हे पाहाणे, हे उद्दिष्ट यामागे होते. आजही त्यांची संप्रेषणाची भाषा त्यांची बोलीच असल्याचे या सर्वेक्षणातून लक्षात आले.

क्षेत्रीय अभ्यासकाळात दररोज सकाळी आठ ते दुपारी दीडदोनपर्यंत ग्रामस्थांना भेटणे; एखाद्या निमशहरात येऊन भोजन करणे, शक्य असल्यास संध्याकाळपर्यंत पुन्हा सर्वेक्षण करणे आणि त्यानंतर निवासस्थानी परतणे, चहापानानंतर प्रत्येकास प्राप्त झालेला शब्दांचा साठा एकत्रितपणे त्या त्या क्षेत्राखाली लिहून घेणे, हा आमचा दिनक्रम असायचा. व्यक्तिशः मी आणि डॉ० धोंगडे हे शब्द लिहून घेत असू. रात्री साडेआठ नऊला भोजन झाले की, पुन्हा 'डेटा ट्रान्स्फर' करण्याचे काम रात्री बाराएकपर्यंत आम्ही करीत असू.

प्रत्यक्ष सोळा दिवसांमध्ये सर्वेक्षण करून हाती आलेल्या शब्दसाठ्याची अकारविल्हे मांडणी करण्याचे काम मार्च २०१२मध्ये दोन दिवसीय शिबिरात करण्यात आले. सध्या त्या शब्दांचे जाती (नाम, विशेषण इत्यादी) लिंग लिहिण्याचे काम सुरू आहे. सर्वेक्षणात लक्षात आलेली मालवणी बोलीची वैशिष्ट्ये हळूहळू स्पष्टपणे हाती येत आहेत. जसे प्रमाण भाषेत एखादा शब्द आ कारान्त असेल तर त्याचे मालवणी बोलीत रूप ओ कारान्त होते. उदाहरणार्थ, दिवा-दिवो, दाणा-दाणो, तसेच शब्दात तीनही अ कारान्त वर्ण असतील तर त्या शब्दातील मधला वर्ण आ-कारान्त केला जातो. उदाहरणार्थ, गवत-गवात, बदक-बदाक, कमळ-कमाळ इत्यादी. अशी अनेक निरीक्षणे हाती येत आहेत. मात्र अभ्यासाअंती ती दाखवून देणेच योग्य ठरेल.

सिंधुदुर्ग जिल्ह्याचे सर्वेक्षण पूर्ण झाल्यानंतर एप्रिल २०१२मध्ये रायगड जिल्ह्यातील सर्वेक्षणास प्रारंभ झाला आहे. रायगड जिल्ह्यातील सर्वेक्षणात समन्वयक डॉ० पुष्पलता राजापुरे-तापस, डॉ० भारती तेंडुलकर, प्रा० संध्या शहापुरे, डॉ० सुरेखा सबनीस, डॉ० सूर्यकांत आजगांवकर, प्रा० वसंत पानसरे, प्रा० भटू वाघ, प्रा० धिंदळे, प्रा० जगदीश संसारे, प्रा० रश्मी शेटये-तुपे, प्रा० शीतक पावसकर भोसले, प्रा० समीर जाधव, सौ० रेश्मा जोशी आणि विभागातील (हंगामी) संशोधन साहाय्यक श्री० संदीप कदम हे सहभागी झाले.

सदर लेखाच्या निमित्ताने पुढील काही बाबी वाचकांच्या निदर्शनास आणून द्याव्याशा वाटतात.

(१) सिंधुदुर्ग जिल्ह्यातील सर्वेक्षणदौऱ्यात सिंधुदुर्गवासीयांनी आम्हाला सर्व प्रकारचे साहाय्य केले. आमच्यासारख्या अपरिचितांचे यथाशक्ती आगतस्वागत केले. आपण बोलत असलेल्या भाषेतील शब्दांचा कोश तयार होत आहे, याचे त्यांना अप्रूपच वाटत असलेले दिसले.

(२) स्वातंत्र्योत्तर भारताचे हळूहळू आपण 'इंडिया' आणि 'भारत' असे वर्णन करू लागलो. त्याचेच दर्शन कोकणातही घडले. असेच रायगड जिल्ह्याबाबतही म्हणायला हवे. दळणवळणाच्या विपुल साधनांमुळे मुंबईपासून हाकेच्या अंतरावरही 'इंडिया' आणि 'भारत' असावा, याविषयी खेदच वाटला.

रायगड जिल्ह्यातील पेण, पनवेल, उरण, अलिबाग, श्रीवर्धन येथील अनेक गावांमध्ये आगरी बोली शब्दकोशाकरिता जे सर्वेक्षण केले त्या सर्वेक्षणात वीस गावांना भेटी देण्यात आल्या. अवघ्या आठ दिवसांत दोनेक हजार शब्द गोळा झालेले आहेत.

मुंबई विद्यापीठाचा मराठी विभाग साधारणपणे डिसेंबर २०१२पर्यंत मालवणी बोलीचा शब्दकोश म०रा०सा०सं० मंडळाकडे सुपूर्द करील, असा मला विश्वास वाटतो.

■

**बोल आर जे बोल : १**

पुण्याची मराठी वेगळी आहे. येथे रेडिओवर बोलताना सजग राहावं लागतं. मी एकदा वेळ सांगताना आठ वाजून चौरेचाळीस मिनिटे, असे म्हटल्याबरोबर 'मला एका लिसनरचा फोन आला, की अगं ते 'चौरेचाळीस' नाही, 'चव्वेचाळीस' आहे.

आरजे शोनाली, पुणे, 'सकाळ', १४ ऑक्टोबर २०१२

# वऱ्हाडी बोलीतील स्वरस्वनिम

रावसाहेब मुरलीधर काळे

**वऱ्हाडी बोलीचे क्षेत्र**

भौगोलिक दृष्ट्या महाराष्ट्राचे तीन प्रमुख विभाग होतात -(१) पश्चिम विभाग-कोकणपट्टी, पश्चिम समुद्र व सह्याद्रीमधील अरुंद पट्टीचा यात समावेश होतो, (२) प० सह्याद्री व बालाघाट यामधील त्रिकोण. प्राचीन काळात यालाच 'कुंतल' असे नाव होते. हा कृष्णागोदेच्या खोऱ्यातील प्रदेश होय, (३) अजिंठ्याचा घाट उतरल्यानंतर लागते तापीपूर्णेचे खोरे. दक्षिणेला सह्याद्री, उत्तरेला सातपुडा अशा दोन समांतर पर्वतरांगांमध्ये ह्या नद्यांचे खोरे आहे. यातील तापीचे खोरे म्हणजे खानदेश हा प्रदेश होय. पूर्णेचे खोरे म्हणजे विदर्भातील वऱ्हाड होय. ('पारंपरिक वऱ्हाडी म्हणींचा सर्वांगीण अभ्यास', डॉ० विठ्ठल वाघ, पृ० ५).

विदर्भात नागपूर, भंडारा, गोंदिया, चंद्रपूर, गडचिरोली, वर्धा, यवतमाळ, अमरावती वाशीम, अकोला आणि बुलढाणा ह्या जिल्ह्यांचा अंतर्भाव होतो. या संपूर्ण विदर्भात बोलीचे एकविध स्वरूप आढळून येत नाही. मात्र, वऱ्हाडी बोलीचे भाषिक क्षेत्र म्हणून यवतमाळ, अमरावती, अकोला, वाशीम आणि बुलढाणा या जिल्ह्यांची नोंद करता येते. ह्या प्रदेशात ८४,७४,९५३ वऱ्हाडी भाषिक आहेत.

**वऱ्हाडी बोलीचे संशोधन**

वऱ्हाडी बोलीचे स्वरूप प्रगट करण्याचे यापूर्वीचे प्रयत्न म्हणजे रामचंद्र आनंदराव उदास यांचा 'मराठी ज्ञानप्रसारका'च्या जानेवारी १८६५च्या अंकातील 'वऱ्हाडप्रांताचे वर्णन' हा लेख (वर्ष १६, अंक, १), त्याचप्रमाणे इतिहासकार या०मा० काळे यांचा 'वऱ्हाडातील मराठी भाषेचे स्वरूप' हा ग्रंथमालेतून प्रसिद्ध झालेला लेख (अंक १२६) व 'विचार-समीक्षा' या लेखसंग्रहातील 'वऱ्हाडी लोकभाषा' हा वा०ना० देशपांडे ह्यांचा मार्च १९२७च्या विविधज्ञानविस्तारात प्रसिद्ध झालेला लेख. मात्र, प्रस्तुत लेखकाला ते उपलब्ध झाले नाहीत.

डॉ० प्रतिमा इंगोले ह्यांचा 'वऱ्हाडी बोली' हा लेख 'भाषा आणि जीवन'मध्ये प्रकाशित झालेला आहे. ('भाषा आणि जीवन' : वर्ष २२, अंक १, हिवाळा २००४, पृ० १२) यात विदर्भाची व्याप्ती, विदर्भाचा प्राचीन विस्तार, वऱ्हाडी बोलीत 'ण'चा अभाव, 'ओ' ऐवजी 'व' वापरतात, 'ला' विभक्तिप्रत्ययाऐवजी 'ले' वापरतात, असे





अनुक्रमणिका

काही वऱ्हाडी विशेष दाखविले आहेत. शेवटी वऱ्हाडी बोली उपेक्षित असल्याचे नोंदविले आहे. अशा स्वरूपाचे 'आजची वऱ्हाडी बोली : स्वरूप व चिकित्सा' व 'वऱ्हाडी बोलीचा सामाजिक अनुबंध' असे दोन लेखही प्रकाशित आहेत. ('महाराष्ट्रातील समग्र बोलींचे लोकसाहित्यशास्त्रीय अध्ययन', २००६, पृ० १०६-११८) इंगोलेंचे 'वऱ्हाडी बोलीचा भाषाशास्त्रीय अभ्यास' हे पुस्तक प्रकाशित झाले आहे. मात्र, या पुस्तकाच्या शीर्षकाप्रमाणे ह्या पुस्तकात वऱ्हाडी बोलीचा भाषाशास्त्रीय अभ्यास केलेला आढळत नाही.

डेक्कन कॉलेज पोस्ट ग्रॅज्युएट अँड रिसर्च इन्स्टिट्यूटच्या डॉ० माधुरी भागवतांनी 'ए स्टडी ऑफ वऱ्हाडी डायलेक्ट इन द नेबरहूड ऑफ अकोला' ह्या विषयांतर्गत विदर्भातील अकोल्यापासून अठरा मैलांवरील म्हैसांग या खेडेगावात बोलल्या जाणाऱ्या वऱ्हाडी बोलीचा भाषाशास्त्रीय दृष्टीने अभ्यास केला आहे. ह्या प्रबंधाची भाषा इंग्रजी आहे. त्यामुळे 'Male' या वऱ्हाडीतील सर्वनामाचा उच्चार 'माले' होते की, 'मले' होते, हे अमराठी अभ्यासकांच्या लक्षात येईल, असे वाटत नाही. तसेच, मूर्धन्य 'ण'चा उच्चार वऱ्हाडीत होतो, अशा काही वऱ्हाडी बोलीच्या उच्चार प्रवृत्तीशी विसंगत नोंदी आढळतात.

प्रस्तुत संशोधनाच्या भाषिक सामग्रीसाठी लोणी ह्या गावाची निवड केली आहे. लोणी हे गाव अकोल्यापासून दक्षिणेस चार किलोमीटर आहे. लोणी ह्या गावाचे भाषिक वैशिष्ट्य असे क़ी, या गावात बोलली जाणारी वऱ्हाडी अकोल्याकडील पूर्व भागात (वऱ्हाडात याला 'देशपट्टी' असे म्हणतात.) बोलली जाणारी व शेगावकडे- अकोल्याकडून पश्चिमेस (याला 'खळसपट्टी' म्हणतात.) बोलली जाणारी वऱ्हाडी आहे.

**लोणी गावचा गावगाडा**

लोणी ह्या गावाची एकूण लोकसंख्या ४५३ आहे. यांतील २४८ पुरुष व २०५ स्त्रिया आहेत. पु० साक्षर २२५, पु० निरक्षर २३, स्त्री० साक्षर १७५, स्त्री० निरक्षर ३०. पाटील समाजाचे ४३, बौद्ध समाजाचे २४, रंगारी समाजाचे ६, मांग समाजाचे ७, एकूण कुटुंब संख्या ९५ आहे. दुग्ध व्यवसाय करणारे कुटुंब ८३, मजुरी करणारे कुटुंब ८, इतर व्यवसाय २, शिक्षणाला जोडलेली कुटुंबे २. भौगोलिक क्षेत्र २४७ एकराचे आहे. यातील कोरडवाहू १७४, ओलीत/लागवडीखालील ६८ एकर जमीन आहे. गावात एकूण २६३ म्हशी, ४ हेल, असा हा लोणी गावचा गावगाडा. यामुळे गावात शेती व दुग्ध व्यवसायाच्या संबंधित असणाऱ्या शब्दांचा वारंवार उच्चार होताना दिसतो.

गावातील लोक देवधर्म वगैरे करणारे नाहीत. दिवसातून एक वेळ हनुमानजींचे दर्शन घेऊन आपापल्या कामात रमणारे लोक आहेत. दररोज हरिपाठ करणारे काही आहेत. ह्याशिवाय प्रवचन, सप्ताह, असे कार्यक्रम होताना आढळत नाहीत. एखाद्या वेळेस जवळच्या गावात कीर्तन, पारायण, सप्ताह असल्यास चारदोन माणसे नेमाने जातात.

काही म्हाताऱ्या स्त्रिया जातात. मात्र, स्त्रियांनी जागरण वगैरे केल्याचे आढळत नाही. या सर्वांचा परिणाम म्हणजे संतांची वचने व त्यांच्या भाषेचा परिणाम जेमतेम झालेला आढळतो.

**कार्यपद्धती**

**भाषिक नमुने गोळा करण्याची पद्धत :**

वऱ्हाडी बोलीचे भाषिक नमुने गोळा करण्यासाठी एकापेक्षा जास्त पद्धतींचा संयुक्तपणे वापर केला आहे. त्या पद्धती पुढीलप्रमाणे -

**(१) प्रश्नावली :** माहीतगाराकडून विशिष्ट पद्धतीने भाषिक नमुने गोळा करण्यासाठी प्रश्नावली तयार केली. ही प्रश्नावली तयार करताना भाषिकांच्या संपूर्ण परिस्थितीचा विचार केला आहे. प्रत्येक प्रश्न हा भाषिकांच्या जीवनाशी संबंधित घेतला आहे. प्रश्नाची भाषा ही वऱ्हाडी ठेवली. प्रस्तुत संशोधक वऱ्हाडी भाषिक असल्याने अशा प्रकारचे प्रश्न सहज तयार करता आले.

**(२) मुलाखती :** प्रश्नावली तयार करून मुलाखती घेतल्या. मात्र, आपली मुलाखत घेतली जात आहे. ती ध्वनिमुद्रित होत आहे. ह्या कारणाने काही माहीतगार प्रमाण मराठी बोलू लागले. काही माहीतगार अती वऱ्हाडी बोलण्याच्या विचाराने वऱ्हाडीत नसलेली भाषिक रूपे उच्चारताना आढळले. काही माहीतगार तर नात्याने काका (गावनात्यानेही) वगैरे लागत असल्याने, मावशीवरून थट्टा करताना आढळून आले. तर, काही म्हणत, सुरेश झामरेचा हायरे (सुरेश झामरे संशोधकाचे मामा). म्हनुन्सन्या आपूली मुलाखत् घेते.

मुलाखतीच्या ह्या पद्धतीची उणीव भरून काढण्यासाठी टेपरेकॉर्डर न वापरता मोबाईलचा वापर केला. मोबाईल खिशात ठेवून (नंतर, ध्वनिमुद्रित केलेले संगणकावर पुन्हा पुन्हा अभ्यासता आले.) सहज ओघाने येणाऱ्या प्रश्नांची विचारणा केली. उदा० (१) तुमच् घर् पुळे चालूल् ते कोनाले सईन् नाई होत् राजे हो. (२) तुमी लहान होते तई पाट्लाच्या घरी जा लागे जेवाले, नाई काका? मग, तात्कालिक संदर्भ विसरून माहीतगार नैसर्गिक बोलीत बोलू लागे. कोणाला कोणता प्रश्न विचारायचा हे आधीच ठरलेले असायचे.

**(३) सहभागी निरीक्षण :** ह्या पद्धतीत संपर्कजाळ्यात प्रवेश मिळवावा लागतो. मात्र, प्रस्तुत संशोधक भाषिकांच्या संपर्कजाळ्यातील एक घटक असल्याने वेगळे प्रयत्न करावे लागले नाहीत. प्रस्तुत संशोधकाने संध्याकाळी ६ ते १०च्या वेळात पारावर (हनुमानजीचे मंदिर), ओट्यांवर, बैलगाड्यांवर बसून भाषकांचे निरीक्षण केले. तर कधी लग्न, बारशे, मंदिरात होणारे विविध विधी ह्यांच्यात सहभागी होऊन तेथे होत असलेल्या चर्चेचे ध्वनिमुद्रण केले.

**(४) दैनंदिनीचा वापर :** अकरा पुरुष माहीतगार व नऊ स्त्री माहीतगार ह्यांना प्रत्येकी एक ह्याप्रमाणे दैनंदिनीचे वाटप केले. पहिल्या पानावर दैनंदिनीत नोंदी कशा करायच्या ते स्पष्ट केले. ह्यामध्ये (१) प्रत्येक तारखेला किमान वीस शब्दांची नोंद करावी. हे वीस शब्द स्वतः उच्चारलेले असावेत. ते जसे उच्चारले तशी नोंद क्र० १ टाकून करायची. उदा० काळ् (काढ). (२) आपल्या उच्चारापेक्षा इतर भाषकांच्या बोलण्यात वेगळेपणा आढळल्यास त्याची नोंद क्र० २ टाकून करावी. (३) पाच वाक्यरचनांची नोंद क्र० ३ टाकून करावी. (४) लोकगीते, लोककथा, उखाणे, म्हणी, वाक्प्रचार येत असल्यास किंवा आढळल्यास त्यांची नोंद क्र० ४ टाकून करावी.

प्रस्तुत संशोधकाने प्रत्येक सात दिवसांनंतर दैनंदिनीचा अभ्यास केला. राहिलेल्या त्रुटी पुन्हापुन्हा माहीतगाराला समजावून सांगितल्या. नोंदीतून मिळालेल्या भाषिक नमुन्यांची आणि ध्वनिमुद्रित केलेल्या नमुन्यांची तुलना केली. जे जे भाषिक नमुने ध्वनिमुद्रित झालेले नाहीत, मात्र दैनंदिनीत आले आहेत अशा नमुन्यांसाठी पुन्हा प्रश्नावली तयार करून ज्या भाषकांच्या दैनंदिनीत नोंद आली त्या भाषकांची मुलाखत घेतली. ध्वनिमुद्रित झालेल्या नमुन्यांची पाहणी करून त्यांचा संशोधनासाठी उपयोग केला.

**वऱ्हाडी बोलीतील स्वनिम**

वऱ्हाडी बोलीचा भाषाशास्त्रीय दृष्टीने अभ्यास केला तर असे आढळून येते की, या बोलीत काही स्वनांचा उच्चार वेगळेपणाने करता येतो. तर काही स्वनांचा उच्चार वरील स्वनांच्या सोबतच करावा लागतो. यावरून वऱ्हाडीत (१) खंडकीय स्वनिम, व (२) पराखंडकीय स्वनिम असे दोन प्रकार करता येतात.

**(१) खंडकीय स्वनिम :** वऱ्हाडीत एकूण ३७ खंडकीय स्वनिम आहेत. यात ६ स्वरस्वनिम, ३१ व्यंजन स्वनिम आहेत. या सर्व स्वनांची निर्मिती फुफ्फुसातून बाहेर पडणाऱ्या हवेचे नियंत्रण करून केली जाते. नाकावाटे हवा आत घेताना स्वन निर्माण केलेले उदाहरण वऱ्हाडीत आढळत नाही. म्हणजे वऱ्हाडीत बहिर्गामी फुफ्फुसीय स्वन आहेत तसे, अंतर्गामी फुफ्फुसीय स्वन नाहीत.

**(२) स्वरस्वनिमांचे वर्गीकरण :** या बोलीत [अ], [आ], [इ], [उ], [ए], [ओ] असे एकूण सहा स्वरस्वनिम आहेत. स्वरांचे वर्गीकरण पुढीलप्रमाणे आहे :

| उच्चार प्रयत्न | उच्चार स्थान | | |
|---|---|---|---|
| | अग्र | केंद्र | पश्च |
| उच्च | इ | | उ |
| मध्य | ए | अ | ओ |
| निम्न | | आ | |

प्रमाण मराठीप्रमाणे वऱ्हाडीतील स्वर घोष आहेत. त्यांचा उच्चार होताना स्वरतंत्री कंप पावतात. वऱ्हाडी बोलीतील या स्वरस्वनिमांचे वर्गीकरण पुढील आधारांवर करता येते.

**(अ) स्वरांचा उच्चार होताना जिभेचा कोणता टाळूच्या दिशेने उचलला जातो यावरून -**

अग्र स्वर : इ, ए मध्य स्वर : अ, आ पश्च स्वर : उ, ओ.

**(ब) जीभ किती उचलली जाते यावरून -**

उच्च : इ, उ मध्य : ए, अ, ओ निम्न : आ.

**(क) ओठांचा आकार कसा असतो यावरून -**

कुंचितोष्ठ : उ, ओ प्रसृतोष्ठ : इ, ए उदासीन : अ, आ.

**स्वरस्वनिमांचे वैशिष्ट्ये**

(१) [अ], [आ] हे स्वर शब्दारंभी विशुद्ध स्वरूपात येतात. मात्र ते मध्य, अंत्य स्थानी विशुद्ध स्वरूपात आढळत नाहीत.

उदा०

अखाळ् - आषाढ, अगीन् - वेदना, अजन् - एक वनस्पती

आकोळा - आकडा, आक्टी - शेकोटी, आग्या - काजवा.

(२) [इ], [उ] हे स्वर स्वनिमांच्या आद्य, मध्य आणि अंत्य स्थानी विशुद्ध स्वरूपात येतात.

उदा०

आद्य : इनाम् - बक्षीस, इपट् - अबोला, इसूतारी - पत्रावळी,
उकड्/ळ् - खताची जागा, उडन् - जरी, उला - चुलीचा एक भाग.

मध्य : कईक् - कित्येक, खईस् - राक्षस, भईर - बाहेर,
कऊल - कवेलू, काऊर - कडक, खऊट - नासके.

अंत्य : उराई - सर्दीपडसे, कई - केव्हा, गूई - गूळ,
बाऊ - फोड, भाऊ - भाऊ, माऊ - स्तन.

(३) [ए], [ओ] हे स्वर शब्दात आद्य, मध्य आणि अंत्य अशा तिन्ही स्थानी विशुद्ध स्वरूपात येत नाहीत. प्रमाण मराठीत शब्दारंभी जेथे [ए], किंवा [ओ] स्वर आढळतो, तेथे वऱ्हाडीत अनुक्रमे [य], [व] श्रुती आढळतो.

उदा० येक - एक, येकूटा - एकटा, येखांदा - एखादा,
वघय् - ओघळ, वटा - ओटा, वल् - ओल.

(४) [ऐ], [औ] ह्या द्विस्वरांचा उच्चार वऱ्हाडीत [ऐ] : अई (अईन् - ऐन), अय् (पैदा - पय्दा), आई (ऐक - आईक), आय् (ऐकत - आय्कत्), [औ] : अव् (सौदा-सव्दा), आऊ (औत-आऊत) होतो.

**स्वरांमधील व्यवच्छेद :**

वऱ्हाडी बोलीतील विविध स्वरस्वनिमांमधील व्यवच्छेद स्पष्ट करण्याकरिता काही लघुयुग्मे.

**(अ) जिभेचा कोणता भाग टाळूच्या दिशेने उचलला जातो यावर आधारित व्यवच्छेद**

| | | | |
|---|---|---|---|
| ई - ऊ : | ईट् - वीट, | ईन् - विहीन, | रीप् - लहान पाटली, |
| | ऊट् - उंट, | ऊन् - उष्ण, | रूप् - रूप. |
| ई - अ : | ईट् - वीट, | ईन् - विहीन, | लीव् - लिहिणे, |
| | अट् - अट, | अन् - आणि, | लव् - लवणे. |
| ए - ऊ : | केळ् - केळ, | देर् - दीर, | पेर् - तुकडा, |
| | कूळ् - कूड, | दूर् - दूर, | पूर् - पूर. |
| ए - अ : | चेव् - जाग, | फेळ् - फेडणे, | सेव् - एक पदार्थ, |
| | चव् - चव, | फळ् - फळ, | सव् - सवय. |
| ए - ओ : | केर् - कचरा, | केळ् - केळ, | बेन् - लहान नाकाचा, |
| | कोर् - तुकडा, | कोळ् - एक रोग, | बोन् - नैवेद्य. |
| ए - आ : | बेरी - तुपावरील मळी, | भेव् - भीती, | शेव् - पदर, |
| | बारी - फेर, | भाव् - दर, | शाव् - उजागर. |
| अ - ऊ : | अस् - असणे, | अळ् - विहीर, | गत् - स्थिती, |
| | ऊस् - उधार, | ऊळ् - उडणे, | गूत् - गुंतणे. |
| अ - ओ : | खय् - खळ, | मई - सुपीक शेत, | रग् - ताकत, |
| | खोय् - खोळ, | मोई - मोळी, | रोग् - व्याधी. |
| आ - उ : | आळी - बाजूला, | काकर् - तास, | भारा - भारा, |
| | उळी - उडी, | कुकर् (इंग्रजी) - कुकर, | भुरा - एक रंग. |
| अ -आ : | चार् - चारावे, | पाट् - बकरी, | माठ् - थंड, |
| | चोर् - चोर, | पोट् - पोट, | मोठ् - मोठे. |



अनुक्रमणिका

(ब) जीभ किती उंच उचलली जाते यावर आधारित व्यवच्छेद

ई - ए : कीव् - कणव, मीस् - बहाणा, लीव् - लिहिणे,
केव् - त्रास, मेस्(इं०)- खाणावड, लेव् - नसणे.

ई - अ : खीर् - एक पदार्थ, तीर् - बान, बीस् - सरस,
खस् - जळ, तर् - खूप, बस् - बसणे.

ई - ओ : कीळ् - कीड, चीप् - तुकडा, मीस् - ढोंग,
कोळ् - एक रोग, चोप् - निग्रह, मोस् - मोस.

ई - आ : ईट् - वीट, मुळी - लहरी, सळी - एकटी,
आट् - पेच प्रसंग, मुळा - मुळा, सळा - एकटा.

उ - ए : खुटा - खुंटा, चुळा - बांगड्या, पुळा - पुडा,
खेटा - रेटा, चेळा - त्रास, पेळा - पेढा.

उ - अ : उगा- चूप, गुयना - गुळणा, धुरा - सीमा,
अगा - पहिला, गयना - दागिना, धरा - धरावे.

उ - ओ : जूत् - जुतणे/जुंपणे, सूस् - सुचणे, सुंग् - हुंगणे,
जोत् - वात, सोस् - सहन करणे, सोंग् - सोंगणे.

उ - आ : उपट् - उपटणे, गुळी - गुढी, बुवा - आत्या,
आपट् - आपटणे, गाळी - मोटारसायकल,बावा- संबोधन.

अ - आ : जर् - सोन्याचांदीचे तार, दळ् - दव, वल् - आर्द्रता,
जार - व्यभिचारी, दाळ् - दृष्ट, वाल् - वेगळे.

ओ - आ : चोट् - शर्यत, दोर् - दोर, मोळ् - खूण,
चाट् - खोटे बोलणे, दार् - दरवाजा, माळ् - माळ.

**(क) ओठांचा आकार कसा असतो यावर आधारित व्यवच्छेद**

ई - ऊ : ईत् - तुत्याचे टोक, नीर् - निव्वळ, रीत् - खाली,
ऊत् - गवत, नूर् - रूप, रूत् - रुतणे.

ई - ओ : चीक् - झाडातील रस, जीत् - जिवंत, पीत् - पित्त,
चोक् - चाटणे, जोत् - जळणारी वात, पोत् - एक स्त्री-अलंकार.

इ- आ : इवा - विडा, इकू - विकणे, खिळा - खिळा,
आवा - भट्टी, आकू - संबोधन, खाळा - गैरहाजिरीचा दिवस.

ए- उ : केवा - त्रास, ठेला - ट्रक, डेंग् - पुरुषी लिंग,
कुवा - विहीर, ठुला - ठेवला, डुंग् - शेताचा लहान भाग.

ए- ओ : केस् - केस जेर् - जिरणे, ढेर - रास/ढीग,
कोस् - बारा मैल, जोर् - शक्ती, ढोर् - गुरे.

वेगळेपण ध्यानात येण्यासाठी विचारात घेतलेले आहेत. चंदगडी बोलीचा स्वतंत्र शब्दसंग्रह आहे. या शब्दसंग्रहाचा विचार भौगोलिक, सामाजिक संदर्भातही अधिक सयुक्तिक ठरतो. उदाहरणार्थ, 'म्हेर' हा शब्द या परिसरातील 'रताळी' या पिकामुळे, तर या परिसरात झालेल्या धर्मांतरामुळे 'बाटका' हा शिवीसदृश शब्द तयार झालेला आहे.

या बोलीतील शब्दांचा प्रमाण मराठीतील शब्दांशी तुलनात्मक विचार नोंदविता येतो. उदाहरणार्थ, 'वसूला' हा शब्द प्रमाण मराठीतील वसूल, वसूली या शब्दाशी संबंधित नाही. चंदगडी बोलीत 'वसूला' हा शब्द 'वशिला' या अर्थाने वापरला जातो. 'वट' हा शब्द 'हुकमत' या अर्थाने वापरला जातो. तर 'वट्टात' हा शब्द या बोलीत दोन भिन्न अर्थाने प्रचलित आहे. 'मिय्या वट्टात वाटणी देऊसकी न्हाय' या वाक्यामध्ये तो 'अजिबात' या अर्थाने येतो. तर 'आमी वट्टात श्यात करूलावात' या वाक्यात तो 'एकत्र' किंवा 'मिळून' या अर्थाने येतो.

चंदगडी बोलीचे सर्वात महत्त्वाचे वैशिष्ट्य म्हणजे तिचे उच्चारण हे आहे. ही बोली एका विशिष्ट उच्चाराने, हेल काढून बोलली जाते. 'जाऊलेसाय...' हा एक शब्द वाटत असला तरी, हा या बोलीमध्ये एका वाक्याचे काम करतो. 'तू जात आहेस का?' या अर्थाने तो वापरला जातो. या शब्दातील 'ऊ' आणि 'सा' या ध्वनींचा उच्चार सुरावटीत केला जातो. 'सा'मधील 'आ'जाणवेल इतका स्पष्ट आणि दीर्घ उच्चारला जातो. अशी उच्चारांची सुरावट या बोलीतील बहुतांश शब्दांबाबत दिसून येते. त्यामुळे व्यवहारात या बोलीलाच एक सुरावट प्राप्त होते. 'तिया यल्लीस' हे वाक्य प्रश्नार्थक आहे. परंतु ही प्रश्नार्थकता या बोलीच्या बलाघात पद्धतीतून, सुरवटीतून आणि सूर ओढण्याच्या पद्धतीतून प्राप्त होते. 'तू आली होतीस का?' हे प्रश्नार्थक वाक्य वरील केवळ दोन शब्दातून विशिष्ट सुरावटीमुळे बोलता येते. 'यल्लीस' या शब्दातील 'ई' आणि 'स' या दोन्ही ठिकाणी सूर ओढला जातो. 'ई'ची सुरावट दीर्घ आहे. ही सुरावट दीर्घ असली तरी शेवटी पुन्हा 'स' उच्चारण्यापूर्वी 'ई'वर जोर दिला जातो. 'तिय्या जाऊललीसाय' या वाक्यामध्ये 'तू' हे सर्वनाम 'तिय्या' असे होते. शिवाय 'तिय्या'चा उच्चार पुन्हा खास सुरावटीमध्ये होतो. ही सुरावट, उच्चारविशेष कोकणीच्या जवळची आहे. अशी विशिष्ट सुरावटीमध्ये बोलली जाणारी बोली तालुक्याच्या पश्चिम विभागात दिसते.

पूर्व विभागात बोलीची सुरावट कन्नडच्या प्रभावाने तयार झालेली आहे. कण्णं (केव्हा), कास (कशाला), खट्टे (कोठे), गसली (गेल्यावर्षी), तण्णं (तेव्हा), तवरस्क (तोपर्यंत), चकोट (चांगले), बळ्यान (खोटे), माज (मला), मिय्या (मी) असे शब्द पूर्वविभागात दिसतात. 'कासनी ते', 'खट्टे गेल्ल्यास', 'कन्नच्च्यान सोदूलोय मसोटीत गेल्ल्यास काय' अशी वाक्ये प्रत्यक्ष ऐकणे हा एक अनुभव असतो. या विभागात तूज, माज, त्यास, तिण्ण, मिण्ण, त्यण्णाणी, ह्मणाणी अशी सर्वनामे वापरली जातात. या

विभागातील उच्चारणे ही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. 'कोठे' ऐवजी येणाऱ्या 'खट्टे' या शब्दातील 'ट्टे'चा लांबवलेला उच्चार हे या बोलीचे वैशिष्ट्य आहे. 'तूण्ण पड्यात कास गल्ल्यास?' (तू परसात का गेला होतास?) या वाक्यातील 'ण्ण, ड्या, ल्ल्या' या जोडाक्षरी शब्दांचे दीर्घ उचारण नवीन व्यक्तीला सहज न उमगणारे असते.

चंदगडी बोलीतील विशेषणे पुढीलप्रमाणे आहेत : दांडगा (मोठा), व्हलस (घाण), बुरसा (घाणरेडा), आंबरसुका (ओलसर), कळकोटा (भांडणे काढणारा), कळखोचरा (भांडणे उकरून काढणारा), काटकोळा (बारीक), किरपन (सडपातळ), धबला (जाडा), हुसभुरक्या (लाज नसणाऱ्या), व्हळके (होय होय म्हणणारे), थुकमारे (बेशरम) अशी विपुल विशेषणे या बोलीत सापडतात. रंगवाचक विशेषणेही अभ्यसनीय आहेत. तांबूस, हिरवट, तांबडालाल, मातकट, तपकिरी, पिवळसर, पिवळाधम्मक अशी ही रंगवाचक विशेषणे आहेत. नक्काडा (लहान), नकबर (चिमूटभर), दांडगा (मोठा), वावभर (एक मीटर), उलासका (थोडासा) अशी आकारमान वाचक विशेषणे दिसतात. तर हिजडी, देवचार, जोगता, जोगती, खज्जाळी, हूसभुरकी, उंडगी अशी विशेषणे शिवीसदृश आहेत.

या बोलीतील साधित विशेषणेही वैशिष्ट्यपूर्ण आहेत. उदाहरणार्थ, वयल्याअंगास *(वरील बाजूस), खायल्याअंगास* (खालील बाजूस), भायल्याअंगास/ भायल्याबाजुस (बाहेरच्या बाजूला), मंगलीमळीक (मंगल सारखी), मागल्यामळीक (मागीलप्रमाणे), तवंम्हेरेन (तेव्हापासून) उशीरच्यान (खूप वेळेपासून). त्याचबरोबर बुरसा (घाणेरडा) तांबडालाल (खूप गोरा), उजळ (गोरा), कडूईक (कडू), गुळमाट (गोड), धबला (जाड), किरपण (बारीक) अशी गुणविशेषणेही या बोलीत वेगळी दिसतात. इतर काही महत्त्वाचे व्याकरणिक विशेष खालीलप्रमाणे :

**(१) सर्वनाम**

**(१) पुरुषवाचक सर्वनामे**

(१) प्रथम पुरुषवाचक : मीय्या/मिण्ण, आमी

उदा० (१) मीय्या भोवोस गेल्लो.

(२) आमी लगनास जाऊलावात.

(२) द्वितीय पुरुषवाचक : तीय्या, तुमी, आमी

उदा० (१) तीय्या खलेटे व्हेतेस. (२) तुमी सांचं भिगीनं यवा.

(३) आमी बेस्तरवारी तुरुकवाडी जाऊवा.

(३) तृतीय पुरुषवाचक : त्यो, ती, त्ये, त्या

उदा० (१) त्यो ह्यंडोरं हानूस गेलाय.

(२) त्या ऊसात भांगलूस गेल्यात.

(२) **दर्शक सर्वनामे : ह्यो, व्हयतो, ही, ह्ये, त्यो, ती, त्ये**

उदा० (१) ह्यो गादा आवंदू पडच हाय.

(२) त्या वावरात गसाली भात केल्लो.

(३) व्हयतो काईच खरं सांगेसका न्हाय.

(३) **संबंधी सर्वनामे : जो, जे, ज्या**

उदा० (१) तू जे व्हयते सांगोलेसाय त्ये काय पटतलं न्हवे.

(२) शिरमीन ज्या मिरसेंगा न्हेलीन त्या चकोट नव्हत्या.

(४) **प्रश्नार्थक सर्वनामे : कोन, काय/कास, खल्यास/खुल्यास, खल्यान**

उदा० (१) कुणास ठाऊक कुठल्या मसोटीत गेलाय.

(२) या बांदाच काय करूच ते पंच ठरीवतील व्हयेतर.

(३) ठ्याच लागोस म्होरे जाऊस खल्यान सांगीटल्याणाय.

(५) **सामान्य सर्वनामे : कुणास, कोण**

उदा० (१) आजकल कोण कुणास इचारण न्हाय.

(६) **आत्मवाचक सर्वनाम : आपनास, आमच्या**

उदा० (१) त्यनी न्हाय यईनात आपनास काय पडलय.

(२) आमच्या कुनगीत भात कापलाव.

पूर्व आणि पश्चिम अशा दोन्ही विभागात भाषिक प्रयोग भिन्न होत असले तरी सर्वनामाची रूपे जवळपास सारखीच आहेत. पूर्व विभागातील सर्वनामांविषयी चर्चा वरती आलेलीच आहे. वरील उदाहरणांमधील वाक्ये मात्र पश्चिम विभागातील आहेत.

(२) **क्रियापद**

येथे क्रियापद विचार काळानुसार नोंदवू.

(१) भूतकाळ :

पश्चिम विभाग - 'मायलेंदी मिरगात पाऊसच दांडगा व्हत्ता.'
'तुमची रोपेत चार जोतं आल्ली.'

पूर्व विभाग - 'तण्णा नाचो नाचोन सेवटास पाय धरल्यान.'

(२) वर्तमानकाळ :

पश्चिम विभाग - 'आमी मिरसेंगा काडूलावात'
'आयी न्हंगडयास पडले'

पूर्व विभाग - 'सर्री माणसं आल्याताय'
'त्यण्णाणी कामात गुत्तोन गेल्याताय'



अनुक्रमणिका

(३) भविष्यकाळ :

पश्चिम विभाग - 'कमळी सुगीत बाऊत व्हईल'
'आयतवारी जॉत यतलं'

पूर्व विभाग - 'आयतारी सकाळ गाडी न्हूस यतीली हाय'
'बक्कळ मतान निवडोत येऊसेत'

सकर्मक क्रियापद

रामून शिवारतली नांगरट करून दिल्यान (पश्चिम विभाग)
दिल्यानात (पूर्व विभाग)

'बाबा सांच खाऊस घून यत्तंला' (पश्चिम विभाग)
यताताय (पूर्व विभाग)

अकर्मक क्रियापद

'आऊ यल्ली' (पश्चिम विभाग)
'मिय्या गेल्लो'
'आऊ यताय'(पूर्व विभाग)
'मिय्या जाऊलाव'

**(३) विभक्ती**

द्वितीयेच्या स, ला, ते या प्रत्ययांमध्ये स, ला, ऐवजी 'स' हा एकच प्रत्यय सर्वाधिक वापरला जातो.

उदाहरणार्थ, जायला - जाऊस, खायला - खाऊस, सभेला - सभेस

तृतीयेच्या 'ने' या प्रत्ययाऐवजी 'न' हा प्रत्यय येतो.

उदाहरणार्थ, त्याने - त्यानं, मताने - मनानं (त्यो आपल्या मनानं गेलाय) किंवा 'तो पायाने लंगडा आहे.' हे वाक्य 'त्ये पायन लंगडं हाय' असे बोलले जाते.

चतुर्थीच्या 'ला' या प्रत्यया ऐवजी 'स' हाच प्रत्यय वापरला जातो.

उदाहरणार्थ, रूपयाला चार - रूपईस चार अनेकवचनातील 'शी' या प्रत्ययाऐवजी 'बर' हा प्रत्यय येतो.

उदाहरणार्थ, तो मित्राशी भांडला - त्यो मित्राबर भांडला किंवा तो त्याच्याशी प्रामाणिक आहे - त्यो त्येचेबर ईस्वासान ऱ्हालाय.

पंचमीच्या ऊन या प्रत्ययाऐवजी 'सन', 'परास' असे प्रत्यय वापरले जातात.

उदाहरणार्थ, गावाहून - गावासनं, त्याचेहून - त्याचेपरास, माहेराहून - माहेरासनं असे प्रत्यय येतात.

षष्ठी, सप्तमी या प्रत्ययांमध्ये विशेष फरक दिसत नाही.

संबोधन 'नो' ऐवजी 'नु' या प्रत्ययाचा वापर या बोलीत केला जातो.

निवडक शब्दसंग्रह (पश्चिम विभाग)

| चंदगडी | | मराठी | चंदगडी | | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| आडाळी | - | विळती | रोड्डा | - | डावा |
| तरक | - | लक्ष | गुत्याडणे | - | धडपडणे |
| तरकेत | - | आठवणीत | इस्तारी | - | पत्रावळी |
| डंग | - | झुडूप | कांबळ | - | पाहुणेर/इर्जिक |
| किरवं | - | खेकडा | काचबारणे | - | गोंधळणे |
| किरपन | - | बारीक | कळखोचरा | - | भांडण काढणारा |
| करक | - | मशार | आरमुट | - | उर्मट |
| बेस | - | फोड | चाटल्यान | - | लवकर |
| काडू | - | गांडूळ | आकेरशिट्टी | - | शेवटी |
| बेडशिवणे | - | घाबरविणे | भुतूर | - | आत |
| वाडभर | - | खूप वेळ | आरगाडी | - | मोठी |
| ब्याद | - | आपत | आचुत्तं | - | आपसूक |
| वांगडं | - | भाजी | नक्काडं | - | लहान |
| परास | - | पेक्षा | आगोप | - | लवकर |
| भाव | - | विहीर | धेडा | - | करवला |
| ईल/यबाव | - | अवतार | किरडावणे | - | लाज सोडणे |
| मोसबा | - | नखरा | डबरा | - | खड्डा |
| तरक | - | आठवण | पासालणे | - | झोपणे |
| देवचार | - | भूत | पाळक | - | काम बंद ठेवणे |
| म्हेर | - | बांध | बळ्यान | - | मुद्दाम |
| गोराब | - | इरल | आगासणे | - | सुकणे |
| अनुशापोटी | - | रिकाम्या पोटी | आवसान | - | धीर |
| डाळी | - | चटई | दिक्कोमाळ | - | विल्हेवाट |

निवडक शब्दसंग्रह (पूर्व विभाग)

| चंदगडी | | मराठी | चंदगडी | | मराठी |
|---|---|---|---|---|---|
| इसरग | - | विसरणे | तगाड | - | पत्रा |
| उमेंद | - | उमेद | तंड | - | जांभा दगड |
| दिक्कोमाळ | - | विस्कटणे | निसण | - | शिडी |
| आरगटणे | - | वेढणे | बळ्यान | - | खोटं |
| आळकी | - | अन्याय | बदीक | - | शेजारी |
| आचुती | - | विनासायास | बळगार | - | कासार |
| आडगारी | - | मध्यमवयीन | बडगी | - | सुतार |
| आळ | - | मजुरी | भवणे | - | फिरणे |
| आळती | - | माप | म्हणी | - | पाट |
| इदगार | - | समोर | मोसबा | - | नखरा |
| इळगी | - | विळती | वांगड | - | भाजी |
| उदार | - | अंगण | व्हगं | - | आडाणी |
| उल्लस्क | - | थोडं | व्हलस | - | घाण |
| करबेव | - | कडीपत्ता | व्हादडणे | - | मारणे |
| कामाटे | - | टोमॅटो | सूडगाड | - | स्मशान |
| कवाट | - | आंडे | रग्गड | - | पुष्कळ |
| कसारकी | - | अंग दुखणे | गरसाळोन | - | गळून पडणे |
| गवर | - | शेणखत | आरगाडी | - | मोठी |
| चंदी/वळचन | | बोळ | जलमजुगी | - | जन्मोजन्मी |
| ढगाटा | - | शेकोटी | | | |

प्रस्तुत लेखात काहीशा अलक्षित राहिलेल्या या बोलीकडे लक्ष वेधण्याचा प्रयत्न आहे. ■

# खानदेशातील लेवा आणि आदिवासी बोली

कैलास सार्वेकर

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळातर्फे महाराष्ट्र राज्याच्या सुवर्ण महोत्सवी वर्षानिमित्त मराठीच्या बोलीभाषांच्या संशोधनाचा प्रकल्प राबविण्याचा मानस व्यक्त करण्यात आला. त्यास अनुसरून मंडळास तौलनिक भाषा व वाङ्मय विभागातर्फे 'उत्तर महाराष्ट्र परिसरात अहिराणी या बोलीबरोबरच खानदेशी लेवा आणि आदिवासी (मावची, वसावे, कोकणी, पावरा इ० बोली बोलल्या जातात. या तीन बोलींचा अभ्यास झाल्यास या परिसरातील बोलींना पुरेसा न्याय दिल्यासारखे होईल.'' असे कळविण्यात आले. याबरोबरच या संशोधन प्रकल्पात उपरोक्त बोलींच्या अभ्यासासाठी
१. अहिराणी बोली - डॉ० म० सु० पगारे २. खानदेशी लेवा - डॉ० कैलास सार्वेकर
३. आदिवासी बोली - डॉ० कैलास सार्वेकर याप्रमाणे बोली व अभ्यासक असतील असेही कळवण्यात आले.

यापूर्वी 'भाषा आणि जीवन' (व० १५ अं० २/उन्हाळा १९९७)मध्ये डॉ० कैलास सार्वेकर यांनी लिहिलेल्या लेखात म्हटल्याप्रमाणे खानदेशात पुढील बोली आढळून येतात.

**खानदेशातील प्रमुख बोली**

| अहिराणी | | | लेवा | आदिवासी | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **मध्यवती** | **नंदुरबारी** | **बागलाणी** | **जळगाव** | **मावची, वसावे** | **कोकणी** | **पावरा** |
| धुळे | नवापूर | मालेगाव | यावल | नवापूर | साक्री | धडगाव |
| साक्री | नंदुरबार | कळवण | रावेर | नंदुरबार | नंदुरबार | |
| शहादा | | | | | | |
| शिरपूर | तळोदा | सटाणा | भुसावळ | तळोदा | तळोदा | |
| शिरपूर | | | | | | |
| शिंदखेडा | शहादा | पेठ, सुरगाणा | मुक्ताईनगर | अक्कलकुवा | अक्कलकुवा | चोपडा |
| अमळनेर | | देवळा | बोदवड | | नवापूर | रावेर |
| भडगाव | | | देवळा | | | यावल |
| एरंडोल,पारोळा,चाळीसगाव, | | | | | | |
| धरणगाव,पाचोरा,चोपडा | | | | | | |

याशिवाय जळगाव जिल्ह्यातील रावेर परिसरात बोलली जाणारी आदिवासी बोली (या बोलीचे स्वरूप नंदुरबार, धुळे परिसरात बोलल्या जाणाऱ्या आदिवासी बोलीपेक्षा भिन्न आहे.) गुजर, लाड-लाडसिक्की, तडवी, तावडी, नेमाडी इ० बोली बोलल्या जातात.

प्रस्तुत शोधप्रकल्पात खानदेशातील लेवा आणि नंदुरबार व धुळे जिल्ह्यातील आदिवासी बोलींचा अभ्यास आहे. त्याची संकल्पित रूपरेषा पुढीलप्रमाणे आहे.

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई

अनुदानित - खानदेशातील लेवा आणि आदिवासी बोली - संशोधन प्रकल्प रूपरेषा

प्रकरण पहिले

खानदेशातील बोली

प्रकरण दुसरे

खानदेशातील लेवा बोली

२-अ. खानदेशातील लेवा बोली - व्याकरण विशेष

२-ब. खानदेशातील लेवा बोली - लोकवाङ्मय

२-क. खानदेशातील लेवा बोली - ललित साहित्य

प्रकरण तिसरे

खानदेशातील प्रमुख आदिवासी बोली-मावची, वसावे, कोकणी, पावरा

प्रकरण चौथे

आदिवासी मावची बोली

४-अ - आदिवासी मावची बोली - व्याकरणिक वैशिष्ट्ये

४-ब - आदिवासी मावची बोली - लोकवाङ्मय

प्रकरण पाचवे

आदिवासी वसावे बोली

५-अ - आदिवासी वसावे बोली - व्याकरणिक वैशिष्ट्ये

५-ब - आदिवासी वसावे बोली - लोकवाङ्मय

प्रकरण सहावे

आदिवासी कोकणी बोली

६-अ. आदिवासी कोकणी बोली - व्याकरणिक वैशिष्ट्ये

६-ब. आदिवासी कोकणी बोली - लोकवाङ्मय

प्रकरण सातवे

आदिवासी पावरा बोली

७-अ. आदिवासी पावरा बोली - व्याकरणिक वैशिष्ट्ये

७-ब. आदिवासी पावरा बोली - लोकवाङ्मय



अनुक्रमणिका

प्रकरण आठवे

८-अ. आदिवासी बोली व ललित साहित्य

प्रकरण नववे

उपसंहार

९ - खानदेशातील बोलीविशेष - भवितव्य

परिशिष्टे : (१) खानदेशातील बोली : शब्दसंग्रह (मराठी-लेवा-मावची-भिल्ली-कोकणी पावरा), (२) शब्दजाती व खानदेशातील विविध बोलींमधील उदाहरणे (३) खानदेशातील विविध बोलींतील वाक्यांची उदाहरणे. (यानंतर संदर्भ साहित्य व ग्रंथ सूची राहील.)

वरील रूपरेषेनुसार प्रकल्पाचे संशोधन कार्य सुरू आहे.

या संशोधन प्रकल्पाप्रमाणे खानदेशातील उपरोक्त लेवा आणि आदिवासी बोलींचा परिचय व्हावा हा उद्देश तर आहेच. शिवाय सुप्रसिद्ध कवयित्री बहिणाबाई चौधरी यांची कविता अहिराणी बोलीतील आहे. असा एक समज खानदेशाबाहेर आहे. विशेषतः भाषा-विज्ञानाच्या व इतर पुस्तकातही तसा उल्लेख आढळतो. (पाहा - 'वर्णनात्मक भाषा विज्ञान स्वरूप आणि पद्धती'. संपा० काळे, डॉ० सोमण, गोखले एज्युकेशन सो०सा नाशिक, प०आ० १९८२. पृ० १८८, 'अहिराणी लोकसाहित्याची वैशिष्ट्ये' डॉ० दा० गो० बोरसे, पृ० २८, 'बहिणाबाईंची गाणी.. एक अभ्यास', पृ० ७८)

वास्तविक पाहता आचार्य प्र०के० अत्रे यांनी 'बहिणाबाईची गाणी' या संग्रहाच्या प्रस्तावनेत या बोलींचा उल्लेख **खानदेशी वऱ्हाडी** असा केला आहे. लेवा बोलीवर वऱ्हाडीचा प्रभाव असल्याने ते योग्य वाटते. मात्र लेवा व अहिराणी या बोलीचा या दोन बोलींचे स्वरूप भिन्न आहे. त्यामुळे तिला अहिराणी म्हणणे योग्य ठरत नाही.

या संदर्भात प्रस्तुत अभ्यासकाने 'भाषा आणि जीवन'मध्ये उपरोक्त शीर्षकाचा लेख लिहिला होता. त्यात अहिराणी आणि 'खानदेशी लेवा या दोन बोलीतील साम्यभेद सांगितला असून 'माझी माय सरसोती' या बहिणाबाई चौधरी यांच्या प्रसिद्ध कवितेचे अहिराणी रूपांतरही मूळ लेवा बोलीतील कवितेच्या ओळींच्या समारे दिलेले आहे.

या अभ्यासाने बहिणाबाईंच्या कवितेच्या बोलीविषयीचा गैरसमज कमी होण्यास मदत होईलच. शिवाय या बोलीचा व पश्चिम खानदेशातील (नंदुरबार, धुळे जिल्हा) आदिवासी बोलींचा परिचय होईल, लेवा बोलीतील बहिणाबाई चौधरी, दिवाकर चौधरी, भानु चौधरी, भालचंद्र नेमाडे, प्रकाश किनगावकर, प्र० श्री० चौधरी तसेच आदिवासी बोलीत लेखन करणाऱ्या वाहरू सोनवणे, नजुबाई गावीत, चामुलाल राठवा, देवेंद्र वसावे आदी लेखकांच्या साहित्याचा परिचय होईल, असे वाटते. या प्रकल्पाविषयी काही सूचना असल्यास त्यांचे स्वागतच होईल. ■

# वऱ्हाडी शब्दयात्रा

विठ्ठल वाघ

'लीळाचरित्र' हा मराठीतील आद्यग्रंथ आणि महंदबेचे धवळे हे मराठीतील आद्य काव्य आहे ही बाब सर्वमान्य झालेली आहे. अन् हे सर्व लेखन वऱ्हाडी बोलीत झालेले आहे. त्यामुळेच वऱ्हाडी बोली ही आजच्या मराठी भाषेची मायकूस ठरते. महानुभाव पंथीयांचे अधिकाधिक ग्रंथलेखनही या वऱ्हाडीबोलीतच झालेले आहे. ही वऱ्हाडी बोलीच माझी मायबोली. मला पाळण्यात घातल्यापासून तिची सोबत मला लाभलेली - अगदी अंगाई गीतापासून -

वाढत्या वयासोबत या बोलीतील गोडवा अधिक जाणवायला लागला. माधुर्य कोवळीक जीवाला वेडावून गेली. कठोर वर्ण मृदू करण्याची तिची लकब काही न्यारीच आहे. मराठीतील 'ड'चा ती 'ळ' करते. 'ळ'चा 'य' करते. पु०लं०नाही या गोष्टीचं मोठं अप्रूप वाटलं. एका पत्रातून ते लिहितात - तुमची वऱ्हाडी बोलीतील कविता, मनाला 'सहेदाची गोळाई' म्हणजे काय ते सांगून गेली. बोलीतला सारा व्यवहार हा प्रतिमातूनच फुलत असतो. म्हणूनच 'परकारातली पऱ्हाटी जशी लुगळ्यात आली' असं तुमची कविता बोलीतून सांगायला लागली की सांगणं आणि सांगण्याची भाषा एकरूप होते. लुगड्याचं 'लुगळं' करण्यातलं बोबडेपण भाषेच्याही बालस्वरूपाचं दर्शन घडवतं आणि त्या कवितेला आंजारावं-गोंजारावंसं वाटायला लागतं.'' वऱ्हाडीच्या या लोभसवाण्या रुपड्यानं ज्ञानेश्वर माऊलींनाही मोहात पाडल्याचं दिसून येईल. त्यांनी वापरलेली येईजे, जाईजे, घेईजे ही शब्दरूपं वऱ्हाडात आजही वापरल्या जाणाऱ्या येजो, जाजो, घेजो, देजोपासूनच घडलेली आहेत. या बोलीचं स्वरूप वर्णन करताना सहज लिहिल्या गेलं -

''इन्द्राघरच्या परीचं नाचनाचता पाऊल
अमृताच्या घागरीले एक दिवस लागलं
कलंडल्यानं घागर सारं अमृत सांडलं
तिच्या थेंबाथेंबातून काही निपजले बोल''

बालपणापासून मी तिच्या दुधावरची साय मनसोक्तपणे चाखतो आहे. त्या बोलीतील एखादी ओवी, पाळणा, म्हण कानावर पडली की मी ती टिपून ठेवायचा. आयाबाया सण उत्सव, जन्म लगन, दळता कांडता गायच्या ते मी जिवाचे कान करून





अनुक्रमणिका

मनात साठवून ठेवायचा. त्यातूनच माझ्या कवितेला शब्दधन अन् लोकगीतांच्या सुरेल चाली मिळाल्या.

एकदा तर मी अमरावती ते जळगाव म्हणजे गाडगेबाबा ते बहिणाबाई चौधरी अशी शेणगाव ते असोदा या त्यांच्या जन्मगावांना जोडणारी काव्ययात्रा काढली होती. ३५ दिवस मी पायी हिंडलो. दररोज ३-४ गावातून काव्यगायनाद्वारे समाजप्रबोधन मी करायचा. गावकऱ्यांकडून म्हणी, गाणी, ओव्या लिहून घ्यायचा. हजारो म्हणींची रास पडली.

बोलीचा मी सर्वक्षेत्रात मनोमन वापर केल्यामुळेच अमरावतीच्या संतगाडगेबाबा विद्यापीठानं माझ्यावर कोशांची जबाबदारी सोपवली. शासनाच्या साहित्य संस्कृती मंडळानं एक ऐतिहासिक प्रकल्प बोलींच्या संदर्भात राबवायला घेतला. महाराष्ट्रातील सर्व विद्यापीठांवर त्या त्या परिसरातील बोलींचे शब्द, म्हणी आणि वाक्प्रचार कोश तयार करण्याची कामगिरी सोपवली. बोलींचे माहात्म्य जाणणारे मधु मंगेश कर्णिक मंडळाचे अध्यक्ष असल्याने हे काम हाती घेऊन त्याला गती देण्यात आली. प्रवास, संदर्भग्रंथ, इतर साहित्य इत्यादीसाठी आर्थिक अनुदानाची तरतूद करण्यात आली. त्या त्या बोलीतील अभ्यासकाची प्रमुख संशोधक अन त्याला मदतनीस म्हणून सहाय्यक संशोधक यांची मानधनावर नियुक्ती करण्यात आली. वऱ्हाडी बोलीच्या अभ्यासावर 'आचार्य' पदवी मिळवणारे डॉ० रावसाहेब काळे मला सहाय्यक म्हणून लाभल्याने आमच्या कोशकार्यात अधिक वेग आला.

वऱ्हाडी बोलीतील शब्द, म्हणी अन् वाक्प्रचार संकलित करण्यासाठी आम्ही वर्धा, अमरावती, यवतमाळ, अकोला, वाशिम आणि बुलढाणा असे सहा जिल्ह्यांचे कार्यक्षेत्र निवडले. दर्यापूर-अंजनगाव तालुक्यांच्या सीमेवर असलेले हयापूर हे आडवळणाचे गाव कार्यारंभासाठी निवडले. विनोद अढाऊ नावाच्या तरुण, कल्पक व या कामाचे महत्त्व जाणणाऱ्या तलाठ्याने गावकऱ्यांना या प्रकल्पाचे मोल समजावून सांगितल्यामुळे गावात प्रचंड उत्साह संचारला होता. रस्ते झाडून साफ. घराघरापुढे सडा-रांगोळ्या, चौकाचौकात शाहू, फुले, ज्ञानेश्वर-तुकारामांच्या प्रतिमांचे पूजन, ढोल-ताशे-लेझिम त्यामागे गावातील स्त्री-पुरुषांची मिरवणूक, घरोघर ओवाळणे....तालुक्याहून आणलेला भव्य कापडी मंडप... लग्नसोहळ्याची आठवण व्हावी असा थाटमाट, गावकऱ्यांकडून आयोजित जेवणावळ, व्हिडीओ कॅमेरे... ते सारं पाहून वाटलं आपलं शब्दधन लाखाच्या आसपास पोहोचणार. आमचा उत्साह पहिल्याच कार्यक्रमानं असा, 'काठोकाठ भरू द्या पेला, फेस भराभर उसळू द्या...' या कोटीचा होऊन गेला...

कमी-जास्त प्रमाणात गावोगाव हेच चित्र दिसू लागलं. मग आम्ही हे काम दोन टप्प्यात करायचं ठरवलं. गावकरी दिवस शेताशिवारात जातात. त्यांच्या भेटीगाठी, चर्चा,

संवाद सायंकाळी साधायचा. दिवसा शाळा-महाविद्यालयातील विद्यार्थी व शिक्षक यांना या प्रकल्पासाठी तुम्ही कसा हातभार लावू शकता हे स्पष्ट करायचं. त्यांचा उत्साह तर अवर्णनीयच म्हणावा लागेल.

एका एका दिवशी वेगवेगळ्या गावातील अनेक शाळांमधून संवाद साधू लागलो. तीस-बत्तीस तालुके प्रवास केल्यानंतर लक्षात आले कितीही हिंडलो तरीही प्रत्येक गावात अन् शाळेत आपण स्वतः काही पोहोचू शकत नाही. गाव तर सुटायला नको म्हणून एक कल्पना सुचली. जि०प०अध्यक्षांचंच या संदर्भात आवाहन करणारं पत्र जाईल अशी सोय केली. दोन-तीनशे महाविद्यालयांना मा० कुलगुरूंचंही पत्र रवाना झालं. उच्च माध्यमिक मंडळाच्या अमरावती विभागाचे अध्यक्ष श्री. शिवाजीराव तांबे यांनी कॉपीमुक्त अभियान सुरू केले होते. प्रत्येक जिल्ह्यातील सर्व मुख्याध्यापकांच्या सभा त्यांनी आयोजित केल्या होत्या. त्यांनी मला सर्व सभांना नेलं. मला काय हवं ते मी सोदाहरण समजावून देऊ लागलो. गाणी, म्हणी, उखाणे सांगू लागलो. सभांचा प्रतिसाद अन् उत्साह मला गगनातच घेऊन गेला.. पुढे पुढे लक्षात आलं की हा प्रतिसाद अन् आदरभाव वाघातील कवीला होता. बोलीचं संशोधन-संकलन करणाऱ्या विठोबाला नव्हता! मराठीचे काय होणार याविषयी चिंतातुर असणाऱ्या सुशिक्षित शिक्षक प्राध्यापकांपेक्षा मला गावागावातील स्त्रीपुरुषांच्या झालेल्या सायंकालीन बैठकींतून अधिक साहित्यसामुग्री मिळाली. घरातील विविध भांड्यांची ८, दागिन्यांची ९५, शिवारातील पिकं खाणाऱ्या भिन्नभिन्न विभागातील गवतांची शंभरसव्वाशे नावं मिळाली. म्हणी मिळाल्या.

लोकांना शब्द अन् म्हणी एका बैठकीत आठवत नाहीत. शब्दांचा वापर तर कमीच झालेला आहे. 'स्टँडवर गेलो. एस०टी० उभी होती. कंडक्टर होता. उभ्या उभ्या स्टँडींग गेलो. ब्रेक लागत नोते' या जातीची भाषा लोक बोलायला लागले आहेत. गावगाडा अन् शेतशिवारातील कामकाजातून जुन्या गोष्टी गेल्या. बैलगाडी, तिफन, पेरणी या अवतीभोवती पाचपंचवीस शब्द फिरायचे. बंडी, जू, रवी, शिवाई, बेळ्ळी, आरा, धूरा, पाठं, शिंगाळा, बुधला, आवन, हरनपाटली, खुटाळं, भराटी वाट, कनाग्रा, गाळं, रेंगी, छकळं, दमनी-- आता कार, फटफटी, ट्रॅक्टर, एसटी आल्यानं हे सर्व कालबाह्य झालेलं आहे.

वास्तविक बोलीतील शब्दसंख्या अफाट असते. मराठीत एकच मीठ असतं. त्यासाठी बोलीत मीठ, लोन, गोळ, सुंदरी, समुंद्री असे अनेक शब्द असतात. आईसाठी मा, माय, माबाई, मायबाई, म्हतारी, बुढी हे शब्द वापरले जातात, हे सारं शब्दधन मराठी शब्द कोशांनी उपेक्षित ठेवल्यानं मराठीची शब्दसंख्या एकसव्वा लाखावर रेंगाळली. मराठीत नसलेले वऱ्हाडीतील २०-२५ हजार शब्द जर मी एकटा संकलित करू शकतो, सर्व वऱ्हाड्यांचा त्याला हातभार लागला, अन् असं प्रत्येक बोलीत घडत गेलं तर

बोलीतील शब्दांची संख्या दोन-तीन लाखावर जाईल. मराठी भाषा केवढी समृद्ध, संपन्न होईल म्हणून बोलीतील शब्दसंकलन हे आपली मायमराठी भाषा संपन्न, श्रीमंत करण्याचं मोठं काम आहे; हे मी कळवळून सांगत असतो.

गावजीवनात अशी कितीतरी क्षेत्रं आहेत ज्यांची माहितीच मराठीला नाही. श्री० म० माट्यांच्या 'भाषाभिवृद्धीची सामाजिक दृष्टी' हा निबंध आठवतो. असे किती समाज लोहार, सुतार, चांभार, कोष्टी, धोबी, पारधी, फासपारधी, धनगर, माळी कुणबी... त्यांच्या किती बोली अन् त्या बोलीतील आजही अज्ञात असलेले कितीतरी शब्द... हे संकलन नेटानं झालं तर शब्दांचा हिमालयच डोळे दिपवून जाईल. यशवंतराव चव्हाणांच्या म्हणण्याप्रमाणे मराठी ज्ञानभाषा झाली पाहिजे. त्यासाठी भाषेतील शब्दसंख्या वाढली पाहिजे. इंग्रजी जगातील प्रभावी अन् ज्ञानभाषा झाली त्याचं कारण सात-आठ लाखावर तिची शब्दसंख्या आहे. जगात जिथे राज्य केलं तेथील शब्द त्यांनी कोशात समाविष्ट करून घेतले. आम्ही आमच्याच बोली दुर्लक्षित, उपेक्षित ठेवल्या. परिभाषेसाठी इंग्रजी शब्दांना पर्याय देतील असे शब्द बोलीतून निवडता येतील. सर्व विषय मराठीतून समजून घेण्याचे सामर्थ्यही भाषेत येईल, म्हणून बोलींचा संकलन, अभ्यास, संवर्धन अपरिहार्य ठरते. शिवाय आपण लोकशाहीचा स्वीकार केलेला आहे. त्यामुळे सर्व शासकीय योजना, कामकाज लोकांपर्यंत सहज पोहोचावे, त्यांना ते कळावे व त्यांचा सहभागही लाभावा यासाठी लोकबोली अन् लोकभाषांचा वापर गरजेचा ठरतो. संस्कृत भाषेवर प्रभुत्व असूनही महानुभावांनी केवळ लोकांच्या हृदयाला हात घालण्यासाठी 'श्री चक्रधरे म्हराठीची निरुपिली, तियोसिचि पुसावे' म्हणून वऱ्हाडी बोलीचा वापर लेखनासाठी केला. तिला धर्मभाषेचे सिंहासन बहाल केले. याचा विसर पडल्यानेच माध्यमांवरील सर्व चर्चा, परिसंवाद हे सामान्य भारतीयाला न कळणाऱ्या इंग्रजीतून झडत असतात, हे दुर्दैव आहे. हे सारे लोकभाषांतून घडायला हवे. तरच ग्रामीणांची नाळ त्या ज्ञानाशी जोडता येईल. याही दृष्टीने बोलींचे महत्त्व अधिकच अधोरेखित होते.

बोलीतून सामान्य माणसाचे, त्या त्या समाजाचे अंतरंगच व्यक्त होत असते. त्याच्या एकूण संस्कृतीचे प्रतिबिंबच त्यातून डोकावत असते. प्रादेशिकताही त्यातून ठळकपणे व्यक्त होते. हिवरखेड हे मोठं गाव, तेथे पुढारी फार. ते अवतीभवतीच्या पाचदहा खेड्यांना वेठीस धरते. 'हिवरखेड गाव कोठं, गोर्धाहिंगणीत घालते बोटं'' ही म्हण ते सारे काही सांगून जाते. माझ्या गावाजवळ वारीचा मारोती आहे. तिथे वाण नदी, नदीत मोठा डोह आहे. लोकांची शनिवारी यात्राच भरते. 'वारीवर न्हाली धुली पन पानी नाही पेली' ही म्हण 'तो कर्मे करी सकळे । परि कर्मबंधा नाकळे । जैसे न सिंपे जली जले । पद्मपत्र'चे स्मरण करून देणारी. बहिरमचा देव खूप उंच टेकडीवर आहे. तिथे येजा करायला खूप श्रम पडतात. एखाद्या कामात खूप कष्ट करावे लागले

तर 'भल्ले बहेरमबॉचे टोले घ्या लागले.' असे वाक्प्रचारातून ते येते. प्रदेशाचे अंतरंग दर्शन असे बोलीतील शब्द, म्हणी, वाक्प्रचारातून घडत असते.

बोलीतील शब्दांचे आणखी एक वैशिष्ट्य म्हणजे त्या शब्दातील अर्थच्छटा प्रमाण मराठीत व्यक्त करता येत नाहीत. आपण अर्थाकडे जातो; पण परिपूर्णतेकडे जात नाही. 'नवं लुगळं नेसलीनपोट्टी पायनं केवढी एलपाळून रायली.' ठाकणे, नखरा करणे यातून ते अचूक पकडता येत नाही. 'डचांग भरली डोब, नवरी बेंडकी रानी', 'डचांग'चा आशय काठोकाठ, शिगोशिगमधून व्यक्त होत नाही. चवना, इगार, रत्नावनं, खोयमोळी, वज्जर या शब्दांचेही असेच व्हायचे. परिपूर्ण, अचूक अर्थासाठी अशा शब्दांची जोपासना मराठीच्या कक्षा विस्तारणारी ठरते. म्हणून मराठी भाषेवर ज्यांचे प्रेम आहे, जीव अडकला आहे त्या त्या लोकांनी, सारस्वतांनी केवळ कथा, कविता, कादंबरी लिहून भागणार नाही. ती भाषा अधिक संपन्न अन् परिपूर्ण करायची तर बोलींची अशी कास धरली पाहिजे. बोलीतील साहित्याचे संकलन, संशोधन, अध्ययन केले पाहिजे. त्यामुळे आपल्या स्वतंत्र निर्मितीतही वेगळेपण, ताजेपणा नावीन्य यायला मदत होते.

बोलीच्या सामर्थ्याला उजाळा देण्याचं मोठं काम या प्रकल्पानं सुरू केलं आहे. त्यात संबंधितांनी, सारस्वतांनी स्वत:ला झोकून द्यायला हवं. हे काम केवळ भाषा समृद्ध करण्याचं नाही तर संस्कृती जोपासण्याचंही आहे. 'माय'ची संस्कृती वेगळी, मम्मीची संस्कृती वेगळी, आचार, विचारातच जमीन अस्मानचे अंतर शब्द बदलल्यामुळे पडते. तुझे आहे तुजपाशी, ते आपण जपायला तगवायला हवे. झेरॉक्स प्रतीसारखी भाषा अन जगणं होत आहे. बोलीच त्यात वेगळेपणा, ताजेपणा, आपलेपणा आणू शकतात. ■

## हे शिक्षण आपलं आहे?

आपल्या देशातील खेड्यापाड्यांत बुद्धीची वानवा आहे काय? मुळीच नाही. तुटवडा कशाचा असेल तर त्या संदर्भातलं प्रशिक्षण परकीय भाषेतच मिळतं, समाजाला समजणाऱ्या भाषेत नसतं हाच. काही उदाहरण देतो. गावठी कट्टा बनवणारे तरुण आहेत म्हणजे ते पिस्तुलं बनवू शकतात. त्याचं काम बेंगरूळ असतं, कारण त्या संबंधातील प्रशिक्षणात ते मार खातात. भवानीनगर येथील अर्धशिक्षित शेतकऱ्यानं नांगरणी आणि पेरणी एकाच यंत्रानं करण्याचा शोध लावला आहे. सायकलवर चालणारं धुण्याचं यंत्र, उन्हावर चालणारं जनित्र इत्यादी यंत्रं प्रशिक्षण नसतानाही आपल्या तरुणांनी बनविलेली आहेत. आपल्या भाषांतून विज्ञान वाहत राहिलं, तर आपली मुलंही जगाला दिपवणारी कामगिरी करू शकतील असं वाटत नाही का?

मनोहर राईलकर, 'लोकसत्ता', ४ ऑक्टोबर २०१२

# बोलींचे अभिलेखागार व संवर्धन केंद्र

## (भारतीय भाषा संस्थान)

कलिका मेहता

भाषेमुळे मनुष्यप्राणी माणूस झाला. ना०गो० कालेलकरांसारखे भाषावैज्ञानिक जेव्हा माणसाला 'बोलणारा प्राणी' म्हणतात तेव्हा ते त्याचे बोलणे म्हणजेच भाषावापराचे सामर्थ्य अधोरेखित करतात. माणसाला प्राण्यांपेक्षा वेगळा ठरवणाऱ्या अशा भाषेला वाहून घेतलेली, मैसूरस्थित, 'भारतीय भाषा संस्थान' (सेंट्रल इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन लँग्वेजेस) ही केंद्र सरकारच्या मनुष्यबळविकास खात्याच्या, उच्चशिक्षण विभागाच्या अंतर्गत कार्यरत असलेली एकमेव भाषासंस्था. हिंदी, इंग्रजी वगळता भारतात बोलल्या जाणाऱ्या सर्व अनुसूचित व अनुसूचितेतर (नॉन-शेल्ड्यूल्ड) भाषांचा व बोलींचा शास्त्रशुद्ध अभ्यास, त्यातील लिखित व मौखिक संहितांचे, भाषासामग्रीचे संशोधन व त्यांचे भाषाविज्ञानाच्या पायावर आधारलेले प्रशिक्षण ही उद्दिष्टे डोळ्यासमोर ठेवून १९६९ साली या संस्थेची स्थापना झाली.

हे ध्येय साध्य करण्यासाठी या संस्थेने भाषेशी संबंधित प्रत्येक क्षेत्राची वाट चोखाळली. साक्षरता, प्रौढशिक्षण, दूरशिक्षण, पत्राद्वारे भाषाशिक्षण, तौलनिक साहित्य, भाषाविज्ञानाच्या संगणकीय, मनोवैज्ञानिक, वंशशास्त्रीय अशा सर्व शाखा-असा एकही विषय नाही की, ज्यात भारतीय भाषा संस्थानने आपला ठसा उमटवलेला नाही. भाषांतरविद्या, कोशनिर्मितिशास्त्र, लोकज्ञान, (फोकलोअर), वाणीविज्ञान, अभिजात भाषा, सामाजिक, भौगोलिक आणि संख्यात्मक भाषाविज्ञान यासाठी तर या संस्थेने स्वतंत्र विभाग निर्मिले. केंद्र व राज्य अशा दोन्ही पातळ्यांवरील भाषानियोजन, पाठ्यपुस्तक निर्मिती, परीक्षापद्धतींचे मूल्यमापन इ० अत्यंत जबाबदारीच्या पण तितक्याच अवघड कामांमध्येही संस्थेचा महत्त्वाचा वाटा असतो.

जगात बोलल्या जाणाऱ्या भाषांची संख्या त्यातील देशांच्या संख्येपेक्षा निश्चितच जास्त आहे. 'बोलली जाते ती भाषा' हा निकष लावल्यास वाणी (स्पीच व्हरायटी), बोली (डायलेक्ट) व भाषा (लेखन) एकसारख्या ठरतील. परंतु प्रत्येक वाणीला बोलीचा दर्जा प्राप्त होत नाही आणि जरी बोली भाषासापेक्ष असल्या तरी सगळ्या बोलींना भाषा म्हणत नाहीत. अनेक बोलींमधली एक प्रमाणबोली असते व तिचेच व्याकरणशुद्ध, लिपीबद्ध, आदर्श असे रूप म्हणजे अधिकृत मान्यता मिळालेली प्रमाणभाषा असते. भाषा ही एका अर्थाने या सर्व भाषाभेदांना सामावून घेणारी अमूर्त अशी संकल्पना असते.





अनुक्रमणिका

एखाद्या भाषेच्या बोली निर्माण होण्याची कारणेही वेगवेगळी असतात. वाणीची अंगभूत परिवर्तनशीलता, भाषक गटांची स्थलांतरे, परकीयांच्या प्रभावामुळे केलेला स्वभाषेचा त्याग व त्यांच्या भाषेचा स्वीकार, परकीय व स्थानिक यांच्या संपर्कातून निर्माण झालेल्या पिजिन, क्रिओल अशा संकरित वाणी, सीमाभागातील वास्तव्य इ० अनेक कारणांमुळे बोली निर्माण होतात.

या टप्प्यावर कधीकधी 'बोली की स्वतंत्र भाषा?' हा प्रश्न उभा राहतो. बोलीतील ध्वनी, शब्द व वाक्यरचना या भाषाबाबींच्या (लिंग्विसूटिक् आयट्म) संख्येवरून व भाषकांच्या संख्येवरून तिला भाषा वा बोलीचा दर्जा दिला जातो. पण फक्त इतकेच पुरेसे नसते. हा जटिल प्रश्न सोडवताना त्याचे सामाजिक व राजकीय पैलू लक्षात घ्यावेच लागतात. राजकीय पाठबळ, सामाजिक प्रतिष्ठा लाभलेली बोली 'भाषा' ठरते.

भारतीय भाषा संस्थान असे संवेदनशील विषय हाताळते. मूळ समस्येच्या खोलवर जाऊन त्यात गुंतलेल्या इतर गोष्टी शोधून काढणे, भाषाभाषांमधले, बोलीबोलींमधले व भाषा आणि बोलींमधले परस्परसंबंध प्रस्थापित करणे, ते भाषकांच्या लक्षात आणून देऊन त्यांच्यात भावनिक ऐक्य निर्माण करणे व या अर्थाने सामाजिक बांधिलकीला जागून राष्ट्रीय विकासाला हातभार लावणे ही अत्यंत महत्त्वाची जबाबदारी भारतीय भाषा संस्थान पार पाडते.

या संस्थेतला, उपयोजित भाषाविज्ञान केंद्रांतर्गत असलेला सामाजिक भाषाविज्ञान विभाग, भाषिक नियोजन, अल्पसंख्याकांच्या भाषांचा व त्यांच्या सामाजिक तसेच भाषिक जीवनाचा अभ्यास या जबाबदाऱ्या प्रामुख्याने सांभाळतो. या विभागातील भाषा-वैज्ञानिकांनी केलेले बंगळुरुमधील तमिळांची बोली, दिल्लीतील पंजाब्यांची बोली, कोचीनमधील ज्यूंची बोली, तसेच मैसूरमधील मुस्लिमांची उर्दू बोली व अँग्लो इंडियन्सची बोली असे अल्पसंख्याकांच्या बोलींवरील संशोधन भाषाविज्ञानाच्या क्षेत्रात अत्यंत मौलिक समजले जाते. याव्यतिरिक्त पश्चिम बंगाल, मध्यप्रदेश, नागालँड व ओरिसातील छोटे छोटे भाषिक गट आणि महानगरातील झोपडपट्ट्यांमध्ये बोलल्या जाणाऱ्या पिजिन, क्रिओल अशा संकरित वाणींचा अभ्यासही या विभागात झालेला आहे. हे संशोधन प्रकाशित झाले असून अहवाल, लेख, प्रश्नपेढी, संशोधनमदतपुस्तिका अशा स्वरूपात उपलब्ध आहे. अल्पसंख्याकांनी केलेला भाषात्याग, भाषाजतन, त्यामागची कारणे, त्यांच्या अस्मितेचा प्रश्न, यजमान भाषेच्या भाषकांचा त्यांच्याबद्दलचा दृष्टिकोन व भाषासंपर्कासारख्या अत्यंत महत्त्वाच्या विषयाच्या अंतर्गत येणाऱ्या प्रश्नांची उकल भाषावैज्ञानिक व सामाजिक दृष्टिकोनातून करण्याचा प्रयत्न या पुस्तकांमध्ये केलेला दिसून येतो.

संस्थेच्या भौगोलिकभाषावैज्ञानिक विभागातील विद्वानांनी भारताचा साक्षरता

नकाशासंग्रह, हिमाचल प्रदेशातील चम्बा जिल्ह्यातील बोलींचा नकाशासंग्रह, पाँडेचेरीतील भाषावापराचा नकाशासंग्रह, पहाडी बोलींचे सर्वेक्षण, झारखंडातील भाषिक चित्र इ० पुस्तके प्रकाशित करून बोलींच्या अभ्यासात भर घातली आहे. भारतातील 'भाषांची माहिती सेवा' (लँग्वेज इन्फॉरमेशन सर्व्हिस) सुरू करण्याच्या संस्थेच्या कामातही या विभागातील भाषावैज्ञानिकांनी सक्रिय पुढाकार घेतला आहे.

भारतीय भाषा संस्थानच्या लोकज्ञान या विभागात मौखिक परंपरा असलेल्या बोलींच्या भाषकांच्या सांस्कृतिक बाजूंवर संशोधन केले गेले आहे. त्यांच्या परंपरा, समजुती, रीतिरिवाज, लोककला, लोकगीते, पारंपरिक कथाकाव्ये, म्हणी, कोडी इ० सामग्री गोळा करणे व शास्त्रशुद्ध पद्धतीने अभ्यासून त्यातून सार्वभारतीय (पान इंडियन) आणि प्रादेशिक तत्त्वे शोधून काढणे हे या विभागाने केलेले प्रमुख काम आहे. या संस्थेत देशभरातल्या अशा लोकसामग्रीच्या दृक्‌श्राव्य फितींचे अभिलेखागार आहे आणि त्यात जवळजवळ १०८ भाषा/बोलींची माहिती रेकॉर्ड करून ठेवलेली आहे.

आपल्या देशात वेगवेगळ्या वंशाच्या आणि वेगवेगळ्या भाषाकुलांतल्या भाषा बोलणाऱ्या असंख्य जमाती आहेत. त्यांच्या भिन्न संस्कृतींमुळे, भिन्न समजुतींमुळे त्यांच्या बोली समृद्ध झालेल्या आहेत. परंतु केवळ अल्पसंख्य असल्यामुळे, बेताच्या सामाजिक व आर्थिक परिस्थितीमुळे आणि राजकीय पाठबळाच्या अभावामुळे राज्यघटनेत तरतूद असूनही त्यांच्या भाषा शिक्षण, राजकारण, जनसंपर्क माध्यमे अशा आधुनिक जीवनशैलीसाठी वापरल्या जाण्याइतक्या विकसित होऊ शकल्या नाहीत.

भारतीय भाषा संस्थानने ठरवलेल्या उद्दिष्टांमध्ये सर्व भाषांच्या विकासाबरोबरच अत्यल्प प्रमाणात ज्ञात; परंतु बहुभाषी भारताचा श्रीमंत भाषिक वारसा जपणाऱ्या लहान लहान भाषांचे आणि अल्पसंख्याकांच्या तसेच आदिवासींच्या मातृभाषांचे नोंदीच्या रूपाने जतन, रक्षण व संवर्धन यांच्या प्रयत्नांचाही समावेश होता. संस्थेने आपल्या उद्दिष्टांना अनुसरून अशा अनेक भाषांवर काम केले आहे. त्या भाषांची ध्वनिव्यवस्था समजावून देण्यासाठी फोनेटिक रीडर, व्याकरणे, शब्दकोश, शिकवण्यासाठीची सामग्री तयार केली आहे. त्यासाठी त्यांच्या बोलींच्या नोंदी करून ठेवल्या आहेत. त्यांचे समृद्ध लोकसाहित्यही रेकॉर्ड करून ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. त्यामुळे ते इतर अभ्यासकांनाही संदर्भासाठी उपयुक्त ठरू शकते.

केंद्रसरकारच्या 'भारत भाषा विकास योजना' या योजने अंतर्गत संविधानाच्या आठव्या कलमात समाविष्ट न केल्या गेलेल्या भाषांचा विकास अपेक्षित आहे. अशा जवळजवळ १०० भाषा आणि १४१ मातृभाषा आहेत. त्यातल्या काही भाषा शाळांमधून शिकवल्या जातात; पण त्यांची जनगणनेत नोंद नाही. उदा० अरुणाचल प्रदेशात बौद्धधर्मीयांकडून शिकवल्या जाणाऱ्या भोटी व खाम्प्टी या भाषा. बहुतेक भाषा शाळेत

शिकवल्या जात नाहीत. खासी सारख्या, अधिकृत भाषेला जवळच्या असणाऱ्या भाषेलाही 'असुरक्षित' घोषित केले आहे. हिंदी या भाषेच्या अंतर्गत येणाऱ्या काही मातृभाषांनाही 'नामशेष होण्याच्या मार्गावर असणाऱ्या भाषा' म्हणून घोषित केले आहे. या भाषांच्या विकासाची जबाबदारीही केंद्रसरकारने भारतीय भाषा संस्थानवरच सोपविलेली आहे.

अशा काही लहान भाषा आणि आदिवासी भाषा नामशेष होण्याच्या मार्गावर आहेत. त्या बोलल्याच जात नाहीत. त्या बोलीच्या भाषकांनी त्यांच्या मातृभाषेचा त्याग केला आहे. या भाषात्यागामागे आर्थिक स्थैर्यासाठी प्रयत्न, अधिक चांगली सामाजिक ओळख हवी असणे, समाजात वरच्या स्तरामध्ये जाण्याचे आकर्षण असणे, तशा संधी मिळणे तसेच राजकीय दबाव इ० अनेक कारणे असतात. आणखीही एका प्रकारे भाषा वा बोली नामशेष होत असते. ती बोलणाऱ्या भाषकांची संख्या नाममात्र असल्यास भाषकांच्या मृत्यूमुळे त्या भाषेचेही अस्तित्व धोक्यात येते. अंदमान-निकोबार बेटांवरील अंदमानीज या भाषकगटाच्या बोलीचे अस्तित्व असेच संपत आले आहे.

अलीकडे युनेस्कोने मृतप्राय/नामशेष होण्याच्या मार्गावर असलेल्या भाषांचा नकाशासंग्रह प्रकाशित केला. त्यात भारतात अशा भाषांची संख्या सर्वात जास्त म्हणजे १९७ आहे. भारतासारख्या अनेक भाषांची देणगी लाभलेल्या देशात धोक्याच्या घंटा वाजू लागल्यामुळे हा प्रश्न ऐरणीवर आला आहे. परंतु युनेस्कोने तयार केलेल्या भारतीय भाषांच्या ॲटलासमध्ये 'भाषा' म्हणून समाविष्ट केल्या गेलेल्या अनेक भाषांना भारत सरकार 'भाषा' मानायला तयार नाही. भारतीय भाषा संस्थानही भारत सरकारने २००१ मध्ये केलेल्या जनगणनेच्या अहवालानुसार भाषा व मातृभाषा असा फरक करते. त्या अहवालात मातृभाषा या अनुसूचितेतर भाषांच्या अंतर्गत 'बोली' म्हणून समाविष्ट केल्या आहेत. शासन त्यांना मान्यता देते. परंतु त्यांना घटनेच्या आठव्या कलमात समावेश करण्याइतके महत्त्वाचे समजत नाही. भारतासारख्या बहुभाषी व भाषावैज्ञानिकांपुढे आव्हान ठरलेल्या देशात नोंदीनुसार १६३५ मातृभाषा आहेत. दहा हजार किंवा त्यापेक्षा जास्त भाषक असल्यास ती भाषा अन्यथा ती मातृभाषा, अशी अत्यंत स्पष्ट सीमारेषा जनगणनेने आखून दिली आहे.

भारतीय भाषा संस्थानने केंद्र सरकारच्या १२व्या योजने अंतर्गत वेगवेगळ्या आदिवासी भाषांचे, मृतप्राय/नामशेष होण्याच्या मार्गावर असलेल्या भाषांचे संरक्षण, जतन आणि संवर्धन यासाठी युद्धपातळीवर प्रयत्न करण्याचे ठरविले आहे. कारण भाषा या संपूर्ण मानववंशाच्या माहितीचे भांडार असतात. संस्थेने त्यासाठी केंद्रसरकारला तीन प्रकल्पही सादर केले आहेत.

या प्रयत्नांमध्ये सर्वप्रथम ह्या मातृभाषा नामशेष होण्याच्या नेमक्या कोणत्या टप्प्यावर आहेत याचे सर्वेक्षण केले जाईल आणि जर खरोखरच ती भयंकर स्थिती उंबरठ्याशी



अनुक्रमणिका

घेऊन ठेपली असेल तर त्या बोलीच्या सविस्तर नोंदी घेतल्या जातील. त्या नोंदी भाषांच्या अभिलेखागारामध्ये ठेवल्या जातील. जर ती बोली वाचवणे शक्य असेल तर नोंदी घेतल्यानंतर प्राथमिक शिक्षणात तिचा अंतर्भाव करण्याचे प्रयत्न केले जातील. भाषकांना त्यांची बोलीसुद्धा किती महत्त्वाची आहे हे लक्षात आणून देऊन तिला प्रतिष्ठा मिळवून देण्याचा प्रयत्न केला जाईल. शब्दकोश तयार करून तिला स्थिर करण्याची धडपड केली जाईल.

अंदमान-निकोबार बेटांवरील अनुसूचितेतर मातृभाषांवर भारतीय भाषा संस्थानने केलेले काम खूपच लक्षणीय आहे. खारिया, कुरुख, मुंडा, निकोबारीज इ० भाषांमधील काही भाषांचे शब्दकोश, तसेच भाषा माहिती सेवा या संस्थेने घेतलेल्या प्रकल्पांतर्गत त्यांचे व्याकरण तयार केले आहे. जारवा भाषेच्या घडणीवर हस्तपुस्तिका तयार आहे. ओंगे भाषेची ओंगे-हिंदी-इंग्रजी सचित्र शब्दावली तसेच ओंगे-हिंदी द्वैभाषिक प्रायमर, 'ओंगे शिका' अशी व्हिडिओ कॅसेट तयार केली आहे. ओंगेंच्या वर्णनात्मक व्याकरणाचा पहिला मसुदा तयार आहे.

आंध्रप्रदेशातील कोडू, कोलामी, कोंडा, कुई या भाषांमधील काहींची भाषा माहिती सेवा प्रकल्पाच्या अंतर्गत तयार केलेली व्याकरणे, काहींची वर्णनात्मक व्याकरणे, शब्दकोश, द्वैभाषिक प्रायमर्स तयार आहेत. या सर्व पुस्तकांबरोबर कुवी भाषेत कॉपी बुक आणि लोकज्ञानावरील पुस्तकही प्रकाशित झाले आहे. आदिवासी उडिया ही भाषा मातृभाषा म्हणून शिकवण्याचा उपक्रम प्रयोगात्मक पातळीवर सुरू आहे.

अरुणाचल प्रदेशातील मातृभाषांवर सर्वात जास्त काम झाले आहे. या प्रदेशात १३ अनुसूचितेतर मातृभाषा आहेत. त्यांच्यापैकी जवळजवळ सर्वच भाषांवर काम झाले आहे. 'आदी' गटाच्या भाषेचा तुलनात्मक अभ्यास, शब्दकोश, 'आपतानी' भाषेचे व्याकरण, शब्दकोश, प्रौढ साक्षरांसाठी प्रायमर, 'मिशिमी' भाषेचे फोनेटिक रीडर तयार आहे. काही भाषांची माहिती गोळा करून झाली आहे. तिथे अनुसूचितेतर अशी अधिकृत नोंद नसलेल्या इतर ३१ मातृभाषा आहेत. त्या भाषांपैकी काही भाषांच्या लोकज्ञानावर, लिपीवर काम झाले आहे. व्याकरणे, सचित्र शब्दावल्या तर जवळजवळ सर्वच भाषांच्या तयार आहेत.

आसाममधील अनुसूचितेतर मातृभाषा व इतर मातृभाषा - विष्णुप्रिया, देवरी, दिमासा, गारो, खासी, राभा, रोंगेमी इ०चीही दखल भारतीय भाषा संस्थानने घेतली आहे व वरील प्रकारची पुस्तके तयार केली आहेत.

बिहार, छत्तीसगड, दादरा व नगरहवेली, दमण व दीव, गुजरातमधील भिली, वारली, हिमाचल प्रदेशातील गोजरी, कुलवी, जम्मू व काश्मीर, झारखंड, लक्षद्वीप, उत्तराखंड, पश्चिम बंगाल अशा भारतातल्या अगदी कोपऱ्यातल्या प्रदेशातल्या



अनुक्रमणिका

मातृभाषांनाही या संस्थेने प्रतिष्ठा मिळवून देण्याचा प्रयत्न केला आहे.

महाराष्ट्रातल्या भिलीच्या विविध रूपांची व्याकरणेही या संस्थेतल्या भाषावैज्ञानिकांनी तयार केलेली आहेत. त्यात देहवाली भिली, डुंगरी भिली, पंचमहाली भिली, राठवी भिली यांचा समावेश आहे.

मणिपूर, मेघालय, मिझोराम, त्रिपुरा हे प्रांतही असेच मातृभाषांच्या बाबतीत समृद्ध आहेत. भारतीय भाषा संस्थानमध्ये त्यांचीही व्याकरणे, शब्दकोश इ०ची निर्मिती झाली आहे. मिझो, कोम अशा काही भाषांची सामग्री इंटरनेटवरही उपलब्ध आहे.

भाषेच्या, मातृभाषेच्या समस्यांचे इतके पदर कदाचित श्वासोच्छ्वासाइतक्या सहजपणे भाषा वापरणाऱ्या आपल्यासारख्या सामान्य माणसाच्या ध्यानीमनीही नसतील. भारतीय भाषा संस्थान केवळ या समस्या लक्षात आणून देत नाही, तर त्या सोडवण्यासाठी शर्थीचे प्रयत्नही करते आहे. या उपक्रमांमुळे भाषेच्या निकषावर माणसाचे श्रेष्ठत्व कनिष्ठत्व मानणाऱ्यांच्या मनातली जळमटे दूर होवोत इतकेच!

■

### झाडी बोली

झाडी बोली ही हिंदी बोलणाऱ्यांच्या प्रदेशाच्या जवळची असल्याने तिच्यावर हिंदीचा परिणाम दिसून येतो. झाडीपट्टी या प्रदेशावर प्रदीर्घकाळ गोंडलोकांची सत्ता होती. या बोलीचा बहुसंख्य समाज शहरीकरणापासून दूर आहे. ण व ळ हे दोन ध्वनी या बोलीत नाहीत. हिंदीचा प्रभाव असल्याने स्त्रीलिंग व पुल्लिंग अशी दोनच लिंगे या बोलीत आहेत. हिंदी वाक्यरचनेच्या प्रभावातून करून राहिलो (कर रहा हूं) अशी वाक्यरचना रूढ आहे. लस्करी (लष्कर), सिनगारी (शृंगारगीत) इतिहासिक (ऐतिहासिक) या लावणी सदृश गीतांच्या नावामध्ये मराठी जाणवते. या बोलीतील रामायण थोडे वेगळे आहे. राम हा वनात गाई पाळतो सीता दही घुसळून लोणी काढते. 'ऊड ऊड पाखरा जा माझ्या मायरो' या लोकगीतावरून कुणालाही ज्ञानेश्वरांच्या 'उड उड रे काऊ' या गीताची आठवण व्हावी. या बोलीतही लिंगभेद दर्शक प्रत्यय क्रियापदाला लागत नाहीत. 'राम जातो वावरी! सीता नेते सिदोरी' यासारख्या गीतावरून ते स्पष्ट होते.

या सगळ्याच बोलींमधील म्हणी, वाक्प्रचार हे तेथील प्रादेशिकतेशी, सामाजिक जीवनाशी संबंधित आहेत. या विविध बोलींमधील लोकसाहित्य हे मराठी माणूस समजून घेण्याचे मोठे दालनच आहे.

लीला गोविलकर - 'लोकराज्य', ऑक्टोबर २०११, पृ० ३७

# बंजारा : बोली, संस्कृती आणि लोकसाहित्य

अनिल काळबांडे

साठोत्तरी साहित्यविश्वात दलित साहित्य, स्त्रीवादी साहित्य इत्यादी पुरोगामी व नवीन संवेदना मांडणाऱ्या प्रकारांनी स्वत:चे स्थान निर्माण केले आहे. या नव्या प्रवाहांत आदिवासी बोलीतील साहित्यास महत्त्वाचे स्थान असणे जरुरीचे आहे. आदिवासींच्या भाषा लिखित स्वरूपात उपलब्ध नसल्या तरीही त्या भाषांमध्ये साहित्याचे एक आगळे व विपुल भांडार आहे. आपल्या देशात आदिवासींची संख्या जवळपास नऊ कोटींची आहे. हे सारे आदिवासी आपला जीवनव्यवहार शंभराहून अधिक बोलींमध्ये चालवीत असतात. हे सारे आदिवासी आपल्या भाषांना मातृभाषेचे स्थान देतात. आदिवासी भाषांतील मौखिक परंपरेत चालत आलेल्या साहित्याचे दस्तऐवजीकरण करून ते प्रकाशित करण्याच्या हेतूने केंद्रीय साहित्य अकादमीने १९९६ मध्ये आदिवासी भाषा : साहित्य प्रकल्पाची स्थापना केली. या प्रकल्पामागे आदिवासी साहित्य परंपरेतील उत्कृष्ट कलाकृतीचे नमुने व त्याचबरोबर त्यांचे मिळत्याजुळत्या प्रमुख भारतीय भाषांतील अनुवाद वाचकांपर्यंत पोहोचवण्याचा हेतू आहे. देहवाली, वारली, कुंकणा, मिझो, गारो, गामीत, गारासिया, गोंड कोरकु, आंध इत्यादी आदिवासी जमातीप्रमाणे 'बंजारा' ही एक मुळात आदिवासी जमात आहे.

आदिवासी जमातीप्रमाणेच भारतातील भटक्या व विमुक्तांच्या भाषा आपल्या सांस्कृतिक परंपरेचा एक मौल्यवान ठेवा आहेत. 'गोर बंजारा' ही बंजारा समाजात प्रचलित असलेली भाषा होय. ही भाषा भारतात आंध्र, महाराष्ट्र, मध्यप्रदेश, राजस्थान व कर्नाटक या प्रांतात वसणाऱ्या बंजारा समाजामध्ये वापरात आहे.

भारतीय समाजजीवनाचे वैविध्य इंद्रधनुष्यासारखे विविध रंगांनी नटलेले आहे. त्यातील एक आगळावेगळा रंग आहे तो बंजारा-लमाण लोकगणांच्या लोकजीवनाचा! बंजारा लमाण गण आपल्या वैशिष्ट्यपूर्ण लोकरंगासह भारतातच नव्हे; तर भारतीय उपखंडात सार्वत्रिक स्वरूपात आढळून येतो. इतर भटक्या समाजाच्या मानाने सर्वत्र पसरलेला व संख्येनी सर्वाधिक असूनसुद्धा त्यांची बोली सर्वत्र एकच आहे. हेही या समाजाचे एक वैशिष्ट्य होय. भारतात विविध राज्यात बंजारा समाज सत्तावीस विविध नावांनी ओळखला जातो. परंतु त्याची बोली 'गोर-बंजारा बोली' ही एकच आहे. संपूर्ण बंजारा गणाला एकसंध ठेवणारी गोर-बंजारा बोली ही सुवर्णकडीच होय.

पुरातन काळापासून गायी-गुरांच्या पाठीवरून मालांची ने-आण करत फिरणारा हा गण पौराणिक साहित्य आणि ऐतिहासिक नोंदी यांतून क्वचित आढळून येत असला तरी त्याचे ते आढळून येणे तसे उपेक्षितच म्हणावे लागेल. कारण बुद्धपूर्व काळापासून अगदी शेवटच्या जनगणना अहवालापर्यंत त्यांच्या सर्वंकष स्वरूपाच्या नोंदी झालेल्या आढळून येत नाहीत. याची कारणे काहीही असोत; पण जातककथाकार बुद्धजातकात कुठेतरी 'बंजारा जातक' लिहून ठेवतो, तर पुराणकथाकार नलराजाच्या विरहात भटकणाऱ्या दमयंतीला कुठेतरीही लमाण बंजारा गणाचा तांडा भेटल्याचे नोंदवतो. पौराणिक काळापासून थेट मोगल राजवटीपर्यंत या समाजाची वेगवेगळ्या नावाने नोंद आढळते. ब्रिटिश कालखंडात अभ्यासक व अधिकाऱ्यांनी त्याचा वेगवेगळ्या हेतूंनी अभ्यास केलेला आहे आणि तो सविस्तर लिहून ठेवलेला आहे. परंतु त्यांनी केलेला अभ्यास पुरेसा नाही. कारण आपली समाजपद्धती आणि परंपरा इतरांपासून गुप्त राहावी असा संकेत एकंदरच लोकजीवनात पाळलेला आढळून येतो. बंजारा समाज हा रानोमाळ भटकत फिरणारा समाज होता. अचानक आलेल्या परकीयांना ते आपला अभ्यास करून देतील असे संभवत नाही. म्हणून गोर बंजारा समाजाच्या गोर बोलीचे लोकसाहित्य व त्यांच्या मौखिक परंपरा यांचा अभ्यास होणे जरुरीचे नव्हे तर निकडीचेही आहे.

बंजारा समाजाचा पारंपरिक व्यवसाय 'लदेणी' होता. 'लदेणी' म्हणजे लादणे किंवा भार लादून नेणे असा होता. गायी गुरांच्या पाठीवरून मालाची ने-आण करणे हा लमाण-बंजारा समाजाचा पारंपरिक व्यवसाय होता. यालाच 'लदेणी' असे म्हणतात. लदेणीचा काळ फार प्राचीन आहे. लदेणीच्या त्यांच्या भारतीय उपखंडातील भ्रमणमार्गालाच लमाण-बंजारा मार्ग म्हणतात.

**बंजारा : आजची स्थिती**

गायी-गुरांच्या पाठीवरून मालाची ने-आण करण्याचा गोर बंजारा लोकाचा स्वतंत्र व्यवसाय होता. या भटक्या अवस्थेत ते सुखी होते. इंग्रज कालखंडात देशात रेल्वेमार्ग आले आणि बंजारा लोकांचा धंदा एका रात्रीत बुडाला. संपूर्ण भारतात फिरणारा हा समाज देशोधडीला लागला. जेथे होता तेथेच जणू गोठून पडला. नव्या व्यवसायाचे कोणतेही तंत्र माहिती नव्हते. उदरनिर्वाहाचे कोणतेही साधन नव्हते, राहण्याचा कोणताही ठावठिकाणा नव्हता. अशा अवस्थेत शेती कुठली असणार? या अवस्थेत पोटाची खळगी भरण्याकरता काही लोक चोऱ्या करू लागले असतील तर दोष कुणाचा? पण त्याचे खापर मात्र संपूर्ण समाजावर फुटले. 'ते बिगरमालकीच्या जमिनीवर येऊन राहू लागले, धंद्याचा शोध घेऊ लागले, नवीन धंदा सापडत नाही, पोट भरत नाही, पोट भरण्यासाठी गावाभोवती रेंगाळू लागले, अशाचा समावेश इंग्रज शासनाने 'गुन्हेगार' जमातीत केला. बंजारा, बेरड, भामटा, राजपूत, भिल्ल, छप्परबंद, कैकाडी, बेलदार, कातकरी, कोळी,

मांग, मांगगारुडी, पारधी, रामोशी, वाघरी, वडार इ० जातीचे लोक इंग्रजांनी गुन्हेगार म्हणून जाहीर केले होते. जन्मापासून त्यांच्यावर गुन्हेगारीचा ठसा मारण्यात आला होता जवळपास दीडशे वर्षे इंग्रजाची राजवट भारतात होती तोपर्यंत बंजारा समाजाची अवस्था अशीच होती. भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर या भटक्या लोकांना गुन्हेगारीतून विमुक्त केले गेले म्हणून आज महाराष्ट्रात बंजारा समाजाला विमुक्त जाती अंतर्गत सवलती दिल्या जातात.

बंजारा समाज आज संपूर्ण भारतभर पसरलेला, विखुरलेला आहे. बंजारा समाजाची लोकसंख्या दीड कोटीपेक्षा जास्त आहे. परंतु आजही हा समाज असंघटित व मागास आहे. भारताच्या प्रत्येक राज्यात बंजारा समाज वेगवेगळ्या वर्गवारीत समाविष्ट केला गेला आहे. संपूर्ण भारतभर पसरलेला हा एकमेव समाज वेगवेगळ्या जनजातींमध्ये समाविष्ट आहे. या समाजाला पूर्वीही कुणी संघटित करण्याचा प्रयत्न केला नाही व आजही फारसा कुणी संघटित करीत नाही. पूर्वीच्या काळापासून समाजात असलेला अज्ञान, दारिद्र्य, मागासलेपणा, देवभोळेपणा, व्यसन, दुःख, व्यथा, वेदना कायम आहे. बंजारा समाजाचे काही लोक आमदार, खासदार, मंत्री, मुख्यमंत्री झाले असतील; परंतु समाजाला संघटित करून नवीन दिशा देण्याचा कुणीही प्रयत्न केला नाही. आजही या समाजाची अवस्था फार हलाखीची आहे. आता तरी सन्मानपूर्वक जगता येईल का? याचीच प्रतीक्षा संपूर्ण बंजारा समाजाला आहे.

### बंजारा बोली व लोकसाहित्य

संपूर्ण भारतभर पसरलेल्या बंजारा समाजाची एकच बोली आहे. त्याला 'गोर बोली' म्हणतात. गोरबोली ही 'इंडोआर्यन' या भाषागटातील बोली आहे. अखिल भारतीय भौगोलिक पातळीवर बोलल्या जाणाऱ्या या 'गोर बोली'मध्ये विपुल प्रमाणात लोकसाहित्य आहे. लोकजीवन, लोकगाथा, लोकउत्सव, शिकारकथा या सर्वांसोबतच इतिहास आणि भौगोलिक आठवणींचा संग्रहही या बंजारा लोकसाहित्यात प्रामुख्याने आढळून येतो.

बंजारा समाजाच्या लोकसाहित्यात 'लेंगी' गीताचे वैशिष्ट्य आगळेवेगळे आहे. 'लेंगी' हे होळी उत्सवाचे गीत होय. होळी हा बंजाराचा समाजाचा अत्यंत आवडणारा - उत्साहित करणारा उत्सव होय. बंजारा तांड्यात जन्मलेल्या प्रत्येक मुलाचे बारसे किंवा नामकरण हे या होळी उत्सवाला व्हायचे. बंजारा बोलीत या बारशाला 'धुंड' असे म्हणतात. एक तर तांड्यातला होळीचा उत्सव आणि त्यात वर्षभरात जन्मलेल्या मुलांचे 'धुंड' बारसे! मग उत्सवप्रिय बंजारा भान विसरून गाणार नाही तर काय? 'लेंगी' गीत दिवाळीपूर्वी गाऊ नये असा संकेत बंजारा समाजात असल्यामुळे गानप्रिय बंजारा समाज दिवाळी कधी संपते याची वाट पाहत असतो. आणि दिवाळी संपताच 'लेंगी' गीताच्या गोड लकेरी प्रत्येक तांड्यात उमटू लागतात.

लेंगी (१) होळी आयीर रतनसंग डफ मंडल ॥धृ०॥ होळी ।...
काये केरोलकडा न काये केरो चमडा ॥१॥
चांदणेरो लकडा न मरगलारो चमडा ॥२॥

भावार्थ : रतनसंग होळी आली आहे तू डफ मढवून घे. हे डफ मढवून घेण्यासाठी कशाचे लाकूड आणि कशाचे चामडे तू वापरशील?... तर चंदनाचे लाकूड आणि हरणाचे कातडे घेऊन तू डफ मढवून घे.

एखाद्या उत्सवाच्या स्वागतासाठी चंदनाचे लाकूड आणि मृगचर्माने डफ मढवून घेण्याची कल्पना किती रम्य आणि मनमोहक आहे. खरे? तर लोकगणात ही कल्पना केवळ बंजाराच करू शकतो. असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

बंजारा 'लेंगी'मध्ये फार ताकद असते. लेंगी घुमू लागल्यास एखाद्या प्रियकराची प्रेयसी बेभान होते. तिला सहज प्रियकराला भेटता येत नाही. आणि मोहसुद्धा आवरत नाही. तेव्हा ती प्रियकराला डफ हळू वाजविण्यासंबंधी सांगते.

लेंगी (२) डफ धीरोल धीरोल धीरोल रसीयो,
डफ धीरो ल र ॥धृ॥
डफ डारो घोर सणीर पोळी पोवतू ।
छोडा दिनी लोया नाचण लगीर ॥१॥ डफ...
उपडारो घोर सणीर पाणी भरतू
फेकदिनी वटला नाचन लगीर ॥२॥ डफ...

**भावार्थ :** माझ्या प्रियकरा, तू डफ हळू, हळू वाजव,
तुझ्या डफाचे निनाद पोळी करताना ऐकले
आणि उंडा (लोया) हातातून तसाच ठेवून मी
नाचायाला लागले रे! तू डफ हळू वाजव
तुझ्या डफाचा आवाज मी पाणी भरताना ऐकला, आणि कशी
रे सांगू? कळशी (वटला) तशीच टाकून देऊन मी
नाचायला लागले म्हणून तू डफ हळू वाजव

बंजारा समाजात होळी या सणाला अनन्यसाधारण महत्त्व आहे. होळी या सणाला गायल्या जात असलेल्या लेंगी गीताला सुद्धा तेवढेच महत्त्व आहे.

बंजारा समाजाचे साहित्य अत्यंत समृद्ध आहे. स्त्रियांचे भावविश्व अतिशय संवेदनशील आहे. बंजारा स्त्रियांना अनेक प्रकारचे काबाडकष्ट करावे लागतात. आपल्या कामांना, प्रथांना अनुसरून बंजारा स्त्रियांचे गाणे उदयास आले आहे. ज्यांच्या घरी लग्नकार्य असते त्यांच्या घरी लग्नाच्या आधी पंधरा-वीस दिवसापासून लग्नाची गाणी

चालू होतात. रात्रीला जेवणावळी आटोपल्यावर बंजारा स्त्रिया डफाच्या व गाण्याच्या चालींवर नाच करतात. त्यामध्ये लंगडीपाई, मोरेर, डोडो-नंगारा अशा प्रकारच्या गाण्याबरोबर नाच असतो. काही गीतांमध्ये आधुनिकता असते, ती अशी :

कुकूरी उबीम सोनेरी मऱ्यमा ।
लकलक लेरा लेरीरे गोरमाटी ।
छोड दो पेनारी घाटीर ॥

**भावार्थ :** कुंकवाच्या डबीत सोन्याची मऱ्यामा (देवीची प्रतिमा) लकाकते आहे. बंजारानो, (गोरमाटी) जुनी परंपरा सोडून द्या आणि नव्याचा स्वीकार करा.

आजही बंजारा समाजात अतिशय गरिबी आहे. इतर लोकांची प्रगती झाली. त्यांच्या इमारती तयार झाल्या; परंतु आपल्या झोपड्या आजही कायम आहेत. त्याचा प्रत्यय गीतामधून येतो :

कोरी कोरेर इटेर माडी ।
आपणी कसेरी माडीरे गोरमाटी ।
करमेम सनकाडीर।

**भावार्थ :** बंजारेतराच्या विटा, सिमेंटाच्या माड्या आहेत.
आपल्या कसल्या आल्यात माड्या?
गोरमाटी (बंजारा)च्या नशिबी केवळ
सनकाड्याच आहेत.

**तीज उत्सव :**

बंजारा स्त्रियाचा श्रावण महिन्यातील अतिशय उत्साहाचा सण म्हणजे 'तीज' होय. मारवाडी समाजात ज्याप्रमाणे 'ज्वारा' हा उत्सव असतो तशाच बंजारा समाजात 'तीज' हा उत्सव असतो. नायकाच्या घरी सार्वजनिकरीत्या तीजाची पेरणी होते. नऊ दिवस कुमारिका (लग्नाळू) मुली सकाळ, संध्याकाळ एकत्र येऊन तीजांना पाणी घालतात, गीत म्हणतात, आठव्या दिवशी 'ढंबोळी'चा कार्यक्रम असतो. राधाकृष्णाचे पूजन होते. मुलीला नवे कपडे करतात. नवव्या दिवशी विसर्जन होते.

गवरीतो चालये ओरे सासेरा ।
रोवत चालीय ओरे सासेरा ।

माझ्या जिवाभावाची सखी गवरी (तीज) आज सासराला जायला निघाली आहे. असे गाणे म्हणत मुली रडत असतात. 'मारी सातळ ये । आजेरो दिवाडो रेतोई जो ॥' आणि तीजाला निरोप देतात.

**दिवाळी :**

तीज नंतर बंजारा गणात मुलीसाठी साजरा होणारा उत्सव म्हणजे दिवाळी होय. भारतीय परंपरेत दिवाळी सण असला तरी तांड्यातून मात्र तो उत्सव म्हणून साजरा होतो. या उत्सवातील मुलींची गाणी कमी आहेत; परंतु ती गाणी फार महत्त्वाची आहेत.

दिवाळीला बंजारा बोलीत 'दवाळी' म्हणतात. दिवाळीचा पहिला दिवस म्हणजे अश्विनी अमावास्येचा. याला बंजारा 'काळीमावस' म्हणतात. या दिवशी लक्ष्मीपूजन होते. लक्ष्मीपूजन आटोपताच मुली हातात मातीचा पसाभर मोठा दिवा गोडे तेलात पेटवून ओवाळतात. तेव्हाचे गीत -

बरसे दनेरी कोट दवाळी तळजा तोणमरो ।
वरसे दनेरी कोट दवाळी मतराल तोण मेरा ।

आज वर्षाचा सण दिवाळी ! ह्या मंगलमय वेळी कुलदेवताला प्रणाम करतात, गाई-गुरांना, आई-वडिलांना प्रणाम करतात. दिवाळीच्या दुसऱ्या दिवशी बहीण भावाला आंघोळ घालते, ओवाळते. गाईच्या शेणाचे किल्ले करून त्यांना पूजतात. या दिवसाला गायी गोधणाचा दिवस म्हणतात.

बंजारा समाजात लग्नाची गाणी, पोळ्याची गाणी, लडी, भजन, हवेली, डावलो, आडदास इत्यादी प्रकारची गाणी असून बंजारा गणाच्या काही कथा सुद्धा आहेत. थोडक्यात बंजारा समाजाचे साहित्य अत्यंत समृद्ध आहे. अनेक प्रकारची गीते त्यात दडलेली आहेत. अनेक कथाही आशयपूर्ण आहे. फक्त गरज आहे बोलीच्या अभ्यासाची!

**संदर्भग्रंथ :**

(१) पाटील, बळीराम, 'गोर बंजारा लोकांचा इतिहास व लोकजीवन', प्रका० - सुधाकर नाईक, किनवट, १९३५.

(२) राठोड, आत्माराम, 'गोरबंजारा लोकसाहित्य', प्रका० - शास्ता आत्माराम राठोड, यवतमाळ, १९९४.

(३) राठोड, आत्माराम, 'लदेणी', प्रका० - शास्ता आत्माराम राठोड, यवतमाळ, १९९२.

■



अनुक्रमणिका

# कातकरी बोली आणि 'भूक' कादंबरी

शंकर सखाराम

एका भल्यापहाटे साखरझोपेत असताना दुःखाने डबडबलेला दगड्या (आदिवासी) कातकरी माझ्या समोर आला. अगदी दुःखावेगाने बोलू लागला- 'मास्तर, मा साळनी कौला इकी, मा इकी - त्या साळमा माना सोहरा शिकत ह्यता - मा कौला इकी' आणि त्याने फासळ्यावर आलेले, पाठीच्या कण्याला चिकटलेले भकाल पोट मला दाखविले. स्वप्नातून मी जागा झालो... ज्या शाळेत दगड्या कातकऱ्याचा मुलगा शिकत होता, त्या शाळेची कौले त्याने विकली. पोटाच्या भुकेसाठी... पुढे काय होणार?.. शाळा बंद. दगड्याच्या मुलाचे शिक्षण संपले...

ह्या विचारांनी माझ्या मनात 'साळा' कथा उभी राहिली. संध्याकाळी रोजनिशीत मी 'साळा' - (शाळा) कथेचे मुद्दे टिपून ठेवले. कथेची सुरुवात, शेवटाची वाक्ये टिपली. आज ना उद्या कथा पूर्ण करू - ह्या विचारांनी रोजनिशी मिटून ठेवली.

काही दिवसांनी 'साळा' ह्या अलिखित कथेवर विचार करता - दगड्या शाळेची कौले का विकतो?... ह्यावर पुन्हा पुन्हा विचार करता - उत्तर समोर आले, त्याच्या पोटाची 'भूक'. - मग सारे कातकरी समाजाचे पूर्वी पाहिलेले नि आज पाहत असलेले जीवन समोर आले... पावसाळ्यात आठाठ दिवस उपाशी राहणारा तो कातकरी - वनचा राजा - पण आज ती वनेच उद्ध्वस्त झालीत... तो खोपडी पिणारा कातकरी. जागतिकीकरणात उद्ध्वस्त झालेली वने-राने; जल, जंगल, जमीन यांची लूटमार. पर्यावरणाचा ऱ्हास यातून कातकरी जीवनावरच्या 'साळा' कथेतून दगड्या नायकाची 'भूक' ही कादंबरी मनात उभी राहिली. मनात विचार आला, कातकरी जीवन शहरी जीवनापेक्षा पूर्ण वेगळे. ते वाचकाला अभिरुचीपूर्ण वाटेलही; पण त्याची बोली?... कातकरी जीवनावरची कादंबरी म्हणजे तीत कातकरी बोली येणे अपरिहार्य. पण कातकरी बोली ललित साहित्यकृतीतून मराठीत फारशी आलेली नाही. कातकरी बोलीवर, कातकरी जीवनावर मराठीत थोडेसे लेखन झाले; पण त्या बोलीतून कथा, कादंबरी तरी लिहून झालेली नाही! 'घुगाट', 'मेल', 'झोंज' ह्या माझ्या कथासंग्रहांत काही कथा कातकरी बोलीतून आल्या आहेत. (त्यातील काही कथा विद्यापीठीय अभ्यासक्रमात नेमल्या गेल्या आहेत.) बाकी कातकरी बोली ललित कृतीतून आलेली नाही. तेव्हा 'भूक' कादंबरीतून ती अपरिचित बोली वाचकांना कशी समजेल?... माझ्यापुढे प्रश्न होता.

'भूक' ही अनेक प्रकारची, ती सर्व प्राण्यांना छळणारी. ती भागविण्यासाठी जिवंत प्राण्याला कायकाय करावे लागते - ती त्याला कशी नाचविते - त्यात मनुष्यप्राणी - कातकरी समाज - दगड्या - असे सारेसारे समोर उभे होते. त्यात दगड्या केंद्रबिंदू. त्याची ती अपरिचित अशी कातकरी बोली. ती कादंबरीतून आलीच पाहिजे, त्याशिवाय 'भूक' कादंबरी निर्जीव होईल. मनाशी निश्चय केला - कादंबरीत जिथेजिथे कातकरी बोली येईल तिथेतिथे कंसात तिचे प्रमाण बोलीत भाषांतर द्यायचे. आणि ही बाब अलिबागच्या खारेपाटातील कातकरी जीवनाशी संबंध असणाऱ्या प्रा० मधू पाटील, प्रा० गंगाधर पाटील व पटकथालेखक श्री० ग०रा० कामत यांना बोलून दाखविली. त्यांनी असे करण्यास नकार दिला. 'ही कातकरी बोली सरळ संवादात येऊ दे. ती जाणकार वाचकाला समजेल. कादंबरीची आधीची काही पाने वाचता वाचता वाचकाला पुढे ती समजत जाईल. पाहिजे असल्यास शेवटी ह्या बोलीचा शब्दकोश दे' - अशी त्यांनी सूचना केली. आणि त्याप्रमाणे 'भूक' (जिच्यावर 'आर्टफिल्म' निघाली) अशी कादंबरी लिहून पूर्ण केली. शेवटी तिला दोन परिशिष्टे जोडली - (१) शब्दकोश आणि (२) कातकरी व त्यांची बोली.

'भूक' (२००८) ही कातकरी बोलीतील मराठीतील पहिली कादंबरी. तिच्यातील कातकरी बोली वाचकांना किती समजेल हा प्रश्न होता. पण ती चांगली वाचली गेली. तिला अनेक पुरस्कार मिळाले. अनेकांनी तीवर एम०फिल० पदव्या प्राप्त केल्या. आज ती इंग्रजीमध्ये येऊ घातली आहे. - पण ती बोली अजिबात समजत नाही अशी वाचकांची तक्रार नाही. कादंबरीची काही पाने वाचल्यावर ती बोली वाचकाला आकलनीय होते. शिवाय सोबतीला व्युत्पत्तीसह शब्दकोश शेवटी आहेच.

आदिवासींतील कातकरी (कात तयार करणारा) समाज हा महाराष्ट्रातील आदिम समाज. आर्य वगैरे त्यांच्यानंतर इथे आलेले. अर्थात आर्यांच्या संस्कृत भाषेआधी इथे कातकऱ्यांची बोली बोलली जात होती. कातकरी समाज स्वत:ला वनाचा राजा समजतो. पण जेव्हा त्याचे वनावर भागत नाही तेव्हा तो वन सोडून गावात, नगरात कामाला जातो. वनातील लाकूडफाटा, वनौषधी, भाजीपाला, केलेली शिकार विकायला गावात, नगरात जातो. त्याचा जास्त संबंध कुणब्यांशी - शेतकऱ्यांशी येतो. तेव्हा हा समाज आपला समाज सोडून इतरांशी विशेषतः कुणब्यांशी बोलताना त्यांच्या कुणब्यांच्या बोलीत बोलतो व आपल्या समाजाशी बोलताना कातकरी बोलीत बोलतो. ह्या त्यांच्या बोली बोलण्याच्या पद्धतीचा उपयोग मी 'भूक' कादंबरीत केला. दगड्या जेव्हा त्याच्या समाजाशी बोलतोय तेव्हाच मी त्या बोलीचा उपयोग कादंबरीत केला. इतर ठिकाणी प्रमाण मराठीचाच वापर केला, त्यामुळे ही कादंबरी समजण्यास सोपी गेली. बरोबरच ह्या बोलीत गुजराती, हिंदी, संस्कृत भाषांतील बरेचसे शब्द असल्याने ते शहरी जाणकार

वाचकांना फारसे अडले नाहीत उदा० अद्घा, तद्घा, कद्घा (आता, तेव्हा, केव्हा). काहींच्या मते कातकरी समाज हा गुजरातकडून इकडे आला. आणि ती शक्यता नाकारता येत नाही; कारण गुजराती भाषेतील बरेचसे शब्द कातकरी बोलीत आहेत. पुढे काही शब्द कातकरी, हिंदी, गुजराती व संस्कृत भाषेतील समोर ठेवतो म्हणजे ह्या बोलीची इतर बोलींशी जवळीकता लक्षात येईल -

| कातकरी | हिन्दी | गुजराती | संस्कृत |
|---|---|---|---|
| चिवा | चुहा | उंदर | उंदरू |
| देडूक | मेंढक | देडके | मंडूक |
| गोहर (घोरपड) | गोहोर | पाटलागो | गोधिका |
| पा | पास | पास | समीप |
| नेहे | नही | नथी | नास्ति |
| अठं | यहाँ | अटे | अत्र |
| कोडा | कितना | केटला | कियत् |
| नांगुळ्या | नेवला | नोलिया | नकुल |
| कुकडा | मुर्गा | कुकडो | कुक्कुट |

असे कितीतरी शब्द कातकरी बोलीतील शब्दांशी साम्य असणारे आहेत. त्या बोलीतील गोहोर, कद्घा, तद्घा, यद्घा, ग्या, अठं, टठं, शी, कुसं, नांगुळ्या, कुकडा, कुकुर, गिध, कुराड, चूल, धनू, वगैरे शब्द पाहिले की मग वाटते हे शब्द ह्या बोलीत संस्कृत वा अन्य बोलींतून अपभ्रंश होऊन आलेले नसून उलट संस्कृत वा अन्य बोलीत (भाषेत) ते कातकरी बोलीतून उद्भ्रंश होऊन गेलेले असावेत. चूल - चुल्लि, वल - वल्ल (वाल), खाटी वगैरे शब्दांचे नंतर संस्कृतीकरण झाले, त्याप्रमाणे दुरुंड - द्रोण, कुराड - कुठार, नांगुळ्या - नकुल, करुंदा - करमद, धनू - धनु, रंडवा - रण्डः, कुकडा - कुक्कुट वगैरे ह्या कातकरी बोलीतील शब्दांचे नंतर संस्कृतीकरण झाले असावे, असे वाटते. साकू (अंडे), वाळूक (काकडी), किर्वा (खेकडे), दुंदा (पिटकूर), ढुडा (घुबड), डौरा (व्हातारा), पोशी (अविवाहित मुलगी) हे ह्या बोलीतील खास शब्द.

ह्या बोलीत बोलताना सुरुवातीला 'हेऽऽ' अशी हेल मारून बोलण्याची पद्धत आहे. 'हेऽऽ पानी (पाऊस) आना रं, चल धौंदी.' ह्या बोलीत आदरार्थी बोलणे नाही. बायको नवऱ्याला अरे-तुरेच करते. 'काय रं काय करहस?' ह्या बोलीत क चा खणखणीत उच्चार होतो - सकाळ, काळा. ण च्या जागी न येतो. - कोन, बान. षष्टीच्या चा, ची, चे, झा, झी, झे प्रत्ययांऐवजी ह्या बोलीत ना, नी, ने हे प्रत्यय येतात - राजाचा-राजाना, माझा-माना, तुझा-तुमना, माझी-मानी. सप्तमीच्या त, ई, आ प्रत्ययांऐवजी

'भूक' ही अनेक प्रकारची, ती सर्व प्राण्यांना छळणारी. ती भागविण्यासाठी जिवंत प्राण्याला कायकाय करावे लागते - ती त्याला कशी नाचविते - त्यात मनुष्यप्राणी - कातकरी समाज - दगड्या - असे सारेसारे समोर उभे होते. त्यात दगड्या केंद्रबिंदू. त्याची ती अपरिचित अशी कातकरी बोली. ती कादंबरीतून आलीच पाहिजे, त्याशिवाय 'भूक' कादंबरी निर्जिव होईल. मनाशी निश्चय केला - कादंबरीत जिथेजिथे कातकरी बोली येईल तिथेतिथे कंसात तिचे प्रमाण बोलीत भाषांतर द्यायचे. आणि ही बाब अलिबागच्या खारेपाटातील कातकरी जीवनाशी संबंध असणाऱ्या प्रा० मधू पाटील, प्रा० गंगाधर पाटील व पटकथालेखक श्री० ग०रा० कामत यांना बोलून दाखविली. त्यांनी असे करण्यास नकार दिला. 'ही कातकरी बोली सरळ संवादात येऊ दे. ती जाणकार वाचकाला समजेल. कादंबरीची आधीची काही पाने वाचता वाचता वाचकाला पुढे ती समजत जाईल. पाहिजे असल्यास शेवटी ह्या बोलीचा शब्दकोश दे' - अशी त्यांनी सूचना केली. आणि त्याप्रमाणे 'भूक' (जिच्यावर 'आर्टफिल्म' निघाली) अशी कादंबरी लिहून पूर्ण केली. शेवटी तिला दोन परिशिष्टे जोडली - (१) शब्दकोश आणि (२) कातकरी व त्यांची बोली.

'भूक' (२००८) ही कातकरी बोलीतील मराठीतील पहिली कादंबरी. तिच्यातील कातकरी बोली वाचकांना किती समजेल हा प्रश्न होता. पण ती चांगली वाचली गेली. तिला अनेक पुरस्कार मिळाले. अनेकांनी तीवर एम०फिल० पदव्या प्राप्त केल्या. आज ती इंग्रजीमध्ये येऊ घातली आहे. - पण ती बोली अजिबात समजत नाही अशी वाचकांची तक्रार नाही. कादंबरीची काही पाने वाचल्यावर ती बोली वाचकाला आकलनीय होते. शिवाय सोबतीला व्युत्पत्तीसह शब्दकोश शेवटी आहेच.

आदिवासींतील कातकरी (कात तयार करणारा) समाज हा महाराष्ट्रातील आदिम समाज. आर्य वगैरे त्यांच्यानंतर इथे आलेले. अर्थात आर्यांच्या संस्कृत भाषेआधी इथे कातकऱ्यांची बोली बोलली जात होती. कातकरी समाज स्वत:ला वनाचा राजा समजतो. पण जेव्हा त्याचे वनावर भागत नाही तेव्हा तो वन सोडून गावात, नगरात कामाला जातो. वनातील लाकूडफाटा, वनौषधी, भाजीपाला, केलेली शिकार विकायला गावात, नगरात जातो. त्याचा जास्त संबंध कुणब्यांशी - शेतकऱ्यांशी येतो. तेव्हा हा समाज आपला समाज सोडून इतरांशी विशेषत: कुणब्यांशी बोलताना त्यांच्या कुणब्यांच्या बोलीत बोलतो व आपल्या समाजाशी बोलताना कातकरी बोलीत बोलतो. ह्या त्यांच्या बोली बोलण्याच्या पद्धतीचा उपयोग मी 'भूक' कादंबरीत केला. दगड्या जेव्हा त्याच्या समाजाशी बोलतोय तेव्हाच मी त्या बोलीचा उपयोग कादंबरीत केला. इतर ठिकाणी प्रमाण मराठीचाच वापर केला, त्यामुळे ही कादंबरी समजण्यास सोपी गेली. बरोबरच ह्या बोलीत गुजराती, हिंदी, संस्कृत भाषांतील बरेचसे शब्द असल्याने ते शहरी जाणकार

वाचकांना फारसे अडले नाहीत उदा० अद्धा, तद्धा, कद्धा (आता, तेव्हा, केव्हा). काहींच्या मते कातकरी समाज हा गुजरातकडून इकडे आला. आणि ती शक्यता नाकारता येत नाही; कारण गुजराती भाषेतील बरेचसे शब्द कातकरी बोलीत आहेत. पुढे काही शब्द कातकरी, हिंदी, गुजराती व संस्कृत भाषेतील समोर ठेवतो म्हणजे ह्या बोलीची इतर बोलींशी जवळीकता लक्षात येईल -

| कातकरी | हिन्दी | गुजराती | संस्कृत |
|---|---|---|---|
| चिवा | चुहा | उंदर | उंदरू |
| देडूक | मेंढक | देडके | मंडूक |
| गोहर (घोरपड) | गोहोर | पाटलागो | गोधिका |
| पा | पास | पास | समीप |
| नेहे | नही | नथी | नास्ति |
| अठं | यहाँ | अटे | अत्र |
| कोडा | कितना | केटला | कियत् |
| नांगुळ्या | नेवला | नोलिया | नकुल |
| कुकडा | मुर्गा | कुकडो | कुक्कुट |

असे कितीतरी शब्द कातकरी बोलीतील शब्दांशी साम्य असणारे आहेत. त्या बोलीतील गोहोर, कद्धा, तद्धा, यद्धा, ग्या, अठं, टठं, शी, कुसं, नांगुळ्या, कुकडा, कुकुर, गिध, कुराड, चूल, धनू, वगैरे शब्द पाहिले की मग वाटते हे शब्द ह्या बोलीत संस्कृत वा अन्य बोलींतून अपभ्रंश होऊन आलेले नसून उलट संस्कृत वा अन्य बोलीत (भाषेत) ते कातकरी बोलीतून उद्‌भ्रंश होऊन गेलेले असावेत. चूल - चुल्लि, वल - वल्ल (वाल), खाटी वगैरे शब्दांचे नंतर संस्कृतीकरण झाले, त्याप्रमाणे दुरुंड - द्रोण, कुराड - कुठार, नांगुळ्या - नकुल, करुंदा - करमद, धनू - धनु, रंडवा - रण्डः, कुकडा - कुक्कुट वगैरे ह्या कातकरी बोलीतील शब्दांचे नंतर संस्कृतीकरण झाले असावे, असे वाटते. साकू (अंडे), वाळूक (काकडी), किर्वा (खेकडे), दुंदा (पिटकूर), ढुडा (घुबड), डौरा (म्हातारा), पोशी (अविवाहित मुलगी) हे ह्या बोलीतील खास शब्द.

ह्या बोलीत बोलताना सुरुवातीला 'हेऽऽ' अशी हेल मारून बोलण्याची पद्धत आहे. 'हेऽऽ पानी (पाऊस) आना रं, चल धौंदी.' ह्या बोलीत आदरार्थी बोलणे नाही. बायको नवऱ्याला अरे-तुरेच करते. 'काय रं काय करहस?' ह्या बोलीत क चा खणखणीत उच्चार होतो - सकाळ, काळा. ण च्या जागी न येतो. - कोन, बान. षष्ठीच्या चा, ची, चे, झा, झी, झे प्रत्ययांऐवजी ह्या बोलीत ना, नी, ने हे प्रत्यय येतात - राजाचा-राजाना, माझा-माना, तुझा-तुमना, माझी-मानी. सप्तमीच्या त, ई, आ प्रत्ययांऐवजी





अनुक्रमणिका

मा प्रत्यय येतो - पोटामा, मान्यामा. ह्या बोलीत च ऐवजी ज येतो - तुलाच - तुलाज, यवडाज. जवळ, पाशी ऐवशी पा वापरला जातो - तुपा - तुझ्याजवळ, मापा - माझ्याजवळ.

ह्या बोलीतील षष्ठी, सप्तमीचे प्रत्यय लक्षात आले आणि जवळ ऐवजी पा, च ऐवजी ज आणि इतर लकबी लक्षात आल्या की ही महाराष्ट्राची आदिम बोली आढळते. थोड्याशा सरावाने बोलताही येते. हिंदी, संस्कृत, गुजराती भाषांशी जवळीक असणाऱ्यांना कातकरी बोली समजण्यास अवघड जात नाही. सर्वात जास्त कातकरी वस्ती असलेल्या रायगड जिल्ह्यातील कातकरी बोली व इतर जिल्ह्यांतील कातकरी बोली यात थोडाफार फरक मात्र आहे. इतर जिल्ह्यांत इस्तो, ईवन, कसव, उंद, उद्या अशा शब्दांऐवजी रायगड जिल्ह्यात इस्तू, इवान, कद्दा, या वरीस उंद्या असे शब्द येतात.

कातकरी बोलीत लोककथा, लोकगीते उत्तम आहेत. 'सूरत'वर गाताना कातकरी लोक रामायणातील उत्तम अशा कथा गीतरूपाने गातात. प्रेताला अग्नी देताना 'कातकऱ्याने जल्मा जाशील त वनचा राजा हाशील' असे अभिमानाने सांगतात.

अशा अनेक गोष्टींचा अर्थात कातकरी संस्कृतीचा विचार करून त्या ओघाने येणारी कातकरी बोली, लोकगीते, लोककथा आणि जागतिकीकरण, राजकारण, पर्यावरण, आदिवासींसाठीच्या सरकारी योजना या साऱ्यांचा विचार करून 'भूक'मध्ये कातकरी बोलीचा वापर केला. जागतिकीकरण काळातील कातकरी बोलीतील मराठीतील पहिली कादंबरी वाचकसन्मुख झाली, याचे समाधान वाटते. ■

**श्रद्धांजली**

मराठी अभ्यास परिषदेच्या कार्यकारी मंडळातील सदस्य कवयित्री डॉ० रंजना फडके यांचे १० सप्टेंबर २०१२ रोजी हृदयविकाराच्या झटक्याने निधन झाले. गेली पाच वर्षे त्या मराठी अभ्यास परिषदेच्या विविध कार्यक्रमांमध्ये उत्साहाने कार्यरत होत्या. मराठी अभ्यास परिषदेतर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली!

शंकर सखाराम यांचे २ ऑक्टोबर २०१२ला दु:खद निधन झाले. ते चेंबूर येथील आचार्य मराठी महाविद्यालयात प्राध्यापक होते. त्यांनी काव्य, व्यक्तिचित्रे, कादंबऱ्या या प्रकारचे विपुल लेखन केले आहे. 'एसईझेड' ही त्यांची वास्तववादी कादंबरी विशेष गाजली. त्यांच्या 'शब्दानुबंध' या पुस्तकाला मराठी अभ्यास परिषदेचा महाबँक पुरस्कारही मिळाला होता. परिषदेतर्फे त्यांना भावपूर्ण श्रद्धांजली !



अनुक्रमणिका

# ‘बारोमास’चे भाषिक सामर्थ्य

केशव तुपे

अलीकडे समाजभाषाविज्ञान ही संकल्पना महत्त्वपूर्ण ठरत आहे. मराठीत अनेक अभ्यासक या संकल्पनेच्या साहाय्याने साहित्यकृतीची तपासणी करू पाहत आहेत. आणि ते भारतासारख्या बहुभाषक देशात गरजेचे आहे. समाजविज्ञानातील विविध संकल्पनांच्या आधारे प्रस्तुत लेखात सदानंद देशमुख यांच्या ‘बारोमास’ या वैदर्भीय या कादंबरीचे विश्लेषण केले आहे. तसेच त्यातून कलाकृती आशयसंपन्न होण्यासाठी बोलीचा वापर करण्यातील औचित्यही लक्षात घेतले आहे.

**‘बारोमास’मधील भाषेचे परिस्थितिजन्य संदर्भ :**

‘बारोमास’ ही सदानंद देशमुख यांची साहित्य अकादमी पुरस्कारप्राप्त कादंबरी आहे. मुळात सदानंद देशमुख हे वैदर्भीय परिसरातील शेतकरी कुटुंबातून आलेले एक साहित्यिक व्यक्तिमत्त्व आहे. त्यांचे ‘लचांड’, ‘उठावण’, ‘खुंदळघास’ हे कथासंग्रह; ‘तहान’ ही कादंबरी याच वैदर्भीय परिसरातील सकस अनुभवविश्वाचा प्रत्यय देणाऱ्या साहित्यकृती आहेत.

**‘बारोमास’मधील कृषिक्षेत्राधिष्ठित भाषिक भांडार :** समाजभाषाविज्ञान भाषेच्या सामाजिक पर्यावरणाचा जसा अभ्यास केला जातो; तद्वतच त्या-त्या प्रदेशातील, प्रांतातील भौगोलिक पर्यावरणाचा देखील अभ्यास केला जातो. एडवर्ड सपीर म्हणतो, ‘‘भाषेला दोन प्रकारचे पर्यावरण किंवा वातावरण असते. पहिले म्हणजे भौगोलिक; ज्यात ती भाषा ज्या प्रदेशात बोलली जाते. त्याचा भूगोल आणि पर्यावरण यांचा समावेश होतो. दुसरे म्हणजे सामाजिक; ज्यात ती भाषा ज्या समाजात बोलली जाते. त्यांची सामाजिक, राजकीय आणि आर्थिक परिस्थिती यांचा समावेश होतो.’’ (उद्‌धृत - पाटणकर, २००५ : ५६) भाषा आणि तिच्या भोवतीचे पर्यावरण यांचा अभ्यास म्हणजेच आयनर हँगर म्हणतो त्याप्रमाणे ‘भाषेची परिस्थिती’ होय. ‘बारोमास’च्या संदर्भात या परिस्थितीचा, विदर्भातील भौगोलिक पर्यावरणाचा आणि भाषेचा संबंध तपासल्यास अनेकविध बाबी हाताशी येतात.

ही कादंबरी विदर्भातील कृषिव्यवसाय, तेथील शेतकऱ्यांचे जीवनमान आणि त्यानुषंगे येणाऱ्या विविध घटकांना आविष्कृत करते. त्यामुळे कृषिक्षेत्राशी निगडित विविध शब्दकळा स्वाभाविकरीत्या या कादंबरीत अवतरते. खेड्यात जमीन/शेत वा मळा विकणे हे तेथील





अनुक्रमणिका

कास्तकारांच्या गावीही नसते. कारण शेतीकडे ते व्यवसाय वा धंदा म्हणून पाहात नाही; तर शेतीकडे ते जीवन जगण्याची पद्धती म्हणून पाहतात. त्यामुळे शेतकऱ्यांच्या भावनिक-मानसिक कोशात शेतीला एक वेगळे स्थान असते; आणि ती परंपरेने चालत आल्यामुळे शेतीसंदर्भातील शब्दांचे विपुल भांडार जमा होत असते. पिकासंदर्भात खोडीची ज्वारी, काळ्या कुसळ्या गहू, हायब्रीड धांडे, भोंडे, भुसकट, सरमड, वखरपाळी, पायखत, रासोंड, रास, खळपूजन इत्यादी विविध शब्द येतात; तर डवरे, चाडे, रुमणे, सायपन सायड असे शेतीच्या अवजारासंबंधीचे शब्द येतात. शेती संदर्भात बखाड, पांदण, खळे, सालमान, वलितीवाली, धूरकटी, दुबार, पेरणी, दाणोडा, कांडारे, नांगराची आगोळ इत्यादी शब्द येतात. त्यांचे अर्थ त्या-त्या संदर्भात अधिक प्रतीत होतात. अशिक्षित शेतकरी, कृषिक्षेत्राशी निगडित असणारे इंग्रजी भाषेतील शब्द उच्चारसुलभ करून सर्रास वापरतात. थ्रेशर, हार्वेस्टर, ट्रॅक्टर, सीडकंपनी, डिफॉल्टर (बँकेचा), टैमपास, असे अनेक शब्द ते सहजगत्या संभाषणात वापरतात. या यंत्रांच्या अंतर्भागातील शब्दही असेच सौकर्याने वापरतात.

**प्राणी व वनस्पतिसृष्टीचे अस्तित्व त्यासंबंधी शब्दकळा :** 'बारोमास'मधून प्राणी व वनस्पती यांच्याशी संबंधित बहुविध नावे येतात. कृषिव्यवसाय हा पारंपरिकदृष्ट्या बैलांशी निगडित आहे. शेतीवर राबणारा हा बैल कास्तकाराच्या कुटुंबाचा एक घटकच असतो. हा शेतकरी त्या बैलांना आणि अन्य पाळीव प्राण्यांना स्वतंत्र नामकरण करून संबोधतो. उदा० गुलब्या-पुण्या, सुकऱ्या-बावऱ्या ही बैलांची नावे येतात; तर पुतनी गाय, गवताळी-चंदी म्हैस. हे प्राणी त्याच्या मनोविश्वाशी एक जैविक-पर्यावरणीय नाते निर्माण करतात. शेतकरी या प्राण्यांबरोबरची संवादक्षमता तसेच संवेदनक्षमता देखील सूचित करतो.

वनस्पतिसृष्टीच्या संदर्भातही काहीसा असाच अनुभव येतो. शेतकरी झाडांमध्ये दैवत पाहतो. त्यांच्यावर घाव घालत नाही. चिंच, लिंब, पिंपळ, वड, आंबा अशा बहुविध झाडांबरोबर काही शुभ-अशुभ बाबी चिकटलेल्या आहेत. त्यामुळे त्यांचे जतन होते. आणि जैविक संवेदनही प्रत्ययास येते. या झाडांचे देखील नामकरण केले जाते.

**सोनेरी टोळी : एक लघुक्षेत्र** - समाजभाषाविज्ञानात लघुक्षेत्र (डोमेन) ही एक महत्त्वाची संकल्पना आहे. कुठलीही व्यक्ती संदर्भागणिक वेगवेगळी भाषा वापरत असते. व्यवसायविशेष, आर्थिक गट, मित्रमंडळी, कुटुंब, पोलिसयंत्रणा, शिक्षणसंस्था, महाविद्यालयीन कट्टा अशा विविध संकल्पनाक्षेत्रांचा समाजामध्ये एक भाषानिधी असतो. तेच एक 'लघुक्षेत्र' होय.

'बारोमास'मध्ये आलेल्या सोनेरी टोळीच्या भाषिक वेगळेपणाचा अभ्यास केल्यावर ते एक 'लघुक्षेत्र' असल्याचा प्रत्यय येतो. या सोनेरी टोळीत मधुकर तनपुरेसह सात-

आठ मित्र आहेत. ही कमीअधिक शिकलेली मित्रमंडळी आपसात संवाद करताना जी भाषा वापरतात; ती त्यांच्या पिढीची काहीशी स्वतंत्र अशी भाषा आहे. त्यामुळे ते काही दिवस - विशेषत: काही रात्री - एकत्र येतात. आपसात मुक्तपणाने संवाद साधतात, अशावेळी भाषा वापरताना व वाकवताना त्यांना कुठल्याही सामाजिक, भाषिक नियमांचा अडसर वाटत नाही. किंबहुना अशा भाषिक नियमोल्लंघनामुळे त्यांना काही काळ दडपलेपणापासून, कौटुंबिक-सामाजिक दाबातून मुक्तता मिळत असावी. सामाजिकदृष्ट्या 'अशिष्ट' शब्द प्रयोग करून आपल्या अगोदरच्या पिढीविषयी वा ईप्सित साध्य झाले नाही, त्यासंदर्भातील संताप ते प्रकट करतात. त्यामुळे ही सोनेरी टोळी त्यांची स्वतंत्र रूपके, प्रतीके, शिव्या वा निषिद्ध शब्द बिनधास्तपणे वापरते. यासंदर्भात काही वाक्यरचना तपासता येतील -

'बांड्या पंचायती करणारे लय आपल्या गावात.'

'ते नेभळं कशाले घेता भाऊले म्हटलं, ते लय शिकेल अन् हुकेल हाये!'

'लेका फुकट्याच्या फुकट्या अन् चवकशा चोदून राह्यला.'

मित्रा-मित्रांत एकमेकांसाठी वापरली जाणारी विशेषणे व काही क्रियापदे त्यांनी स्वतंत्रपणाने निर्माण केली आहेत. उदा० 'च्युतम सल्फेट', 'नेभळ्या वाणाचं', 'हिजड्याची अवलाद', 'साल्या', 'हारण काळज्या' अशी विशेषणे ते वापरतात; तर पुलीवरचा पट्टा सरकणे, शाकी लागणे , तडसून जेवणे, जिंदगीले उकरी लागणे अशी नवी क्रियापदे वापरली आहेत. काही नवे सामासिक शब्दही ते निर्माण करतात. उदा० इच्चकडोणा, फालतू, कंदाडू, बंबुन्यामारी, चिरगुट चोक्या, रिकामटवळा, गधीले गळाण. एखाद्याकडे फारसे कर्तृत्व नाही असे दिसून आल्यास त्याला हिणवण्यासाठी स्त्रीसंबंधित शब्दांचा आधिक्याने वापर केला जातो. उदा० बाईलबुग्या, गायतोंड्या, बायल्या, हारण काळज्या इ०

एकनाथ व त्याचे मित्र महाविद्यालयीन जीवनात जी भाषा वापरत होते, उदा० जिद्द, चिकाटी, मोहतुंबी इ० - ती देखील या लघुक्षेत्राशीच निगडित अशी आहे. या महाविद्यालयीन मित्रांच्या वर्तुळात जिद्द म्हणजे मुलींचा वक्ष भाग आणि चिकाटी म्हणजे नितंब असे संबोधले जायचे. या ठिकाणी विनोदनिर्मिती होत असली; तरी ती त्या वर्तुळापुरतीच मर्यादित असेल. आणि ती देखील फारशी श्रेयस्कर नाही. या भाषिक लघुक्षेत्राची व्याप्ती ही त्या-त्या गटापुरतीच मर्यादित असते. आणि त्यांचा कालावकाश देखील सीमित असतो.

**'बारोमास'मधील स्त्रियांची भाषा :** स्त्री-पुरुष हा भेद नैसर्गिक असला; तरी या भेदाच्या घडणीला सामाजिक-सांस्कृतिक आयाम असतात. स्त्री आणि पुरुष यांच्यासाठी समाजागणिक काही विशिष्ट, भिन्न संकेत असतात; मूल्यव्यवस्था; तसेच कुटुंबसंस्थेतील

स्थानात फरक असतो. त्याचा परिणाम त्या स्त्रियांच्या व पुरुषांच्या भाषिक वापरावर होणे साहजिकच असते.

'बारोमास'मधील वैदर्भीय मराठी संस्कृती ही पुरुषसत्ताक अशा स्वरूपाची आहे. त्यामुळे स्त्रियासंबंधी येथे विशिष्ट भाषिक संकेत तयार झालेले दिसून येतात. लज्जा, हळुवारपण, सौंदर्य या बाबी 'स्त्रीत्व' या संकल्पनेशी आपोआप निगडित झाल्या आहेत. आणि पुरुषवर्ग देखील त्यांच्याकडून अशीच अपेक्षा करतो. कादंबरीतील 'अलका' ही व्यक्तिरेखा पाहण्याजोगी आहे. मुळात अलका मोहाडीसारख्या शहरी भागात राहिलेली आहे. ती शिक्षित कुटुंबातून पुढे आलेली आणि स्वत:ही उच्चशिक्षित आहे. त्यामुळे तिच्या बोलण्यात बरेचसे इंग्रजी शब्द येतात. शिवाय तिच्या जगण्या-वागण्याची पद्धती आधुनिक जगाला जवळ करणारी अशी आहे. 'सांजोळ' या खेड्यातील वातावरण तिला मानवत नाही. तेथील कुटुंबाची भाषा तिला अडाण्यांची भाषा वाटते. ती सतत शिष्ट - नागरी भाषा वापरण्याचा प्रयत्न करते. शक्यतो आपला तोल ढळू न देता, ग्राम्य शब्द टाळून, मोजके शब्द वापरून ती बोलण्याचा प्रयत्न करते.

अलकाच्या उलट शेवंतामाय या व्यक्तिरेखेची स्थिती आहे. ती अस्सल ग्रामीण वऱ्हाडी बोलीत तिच्या खास ठसक्यात आणि शब्दाची कुठलीही काटकसर न करता अघळपघळ बोलते. तिच्या लेखी शब्द शिष्ट आणि अशिष्ट असत नाहीत वा शब्दांची निवड देखील ती करत नाही. शेवंतामाय बिनधास्तपणे आपल्या तळघरात कोंडलेल्या अनुभवांना पारंपरिक पद्धतीने वाट करून देते. अलका व शेवंतामाय यांचे संवाद आधुनिक व पारंपरिक किंवा शहरी व नागर भाषेचा नमुना या दृष्टीने विचारार्ह ठरतील.

एकनाथच्या कुटुंबाला बँकेचा भरणा करण्यासाठी व बी भरणासाठी पैशाची आवश्यकता असते. तेव्हा अलकाच्या सोन्याच्या बांगड्या विकायचा विषय निघतो. त्याप्रसंगी या दोघींचा संवाद अशा-

''मी नाही देत बांगड्या, पोथ विकली ती अजून घेऊन नाही दिली. तुमचं तुम्ही काही करा. ही रड का एका दिवसाची आहे?... ढोरासारखं जगावं लागते बाई या घरात.''

''मंग कावून नाई बंगलेवाला पाह्यल्ला तुपल्या नोकरदार बापानं?... ज्या खुट्याचं ढोर त्याच खुट्याले बांधायला पाहिजे व्हतं पह्यलं. कावून खुटा चुकवला?''

''वावरवाला म्हणून जुळवलीच नव्हती सोयरीक, एम.ए.,बी.एड. पाहून दिलं होतं, नोकरी लागेल म्हणून.''

''...(नोकरीसाठी) एवढे मोठे पैसे कुठून द्याचे आस्ते?''

''शेत विकायचं असतं, असा तरी काय पीक होते त्या शेतात...''

''हावं, बरोबर हाये तुहं! तुमच्यासाठी आमी वावर इकायचं आस्तं. नी तुम्ही

राह्यचे अस्ते शहरगावात राजाराणीसारखे; अन् आमी बसलो असतो इथे दाताचं पाणी गिळत!''

''वावराची एवढी चिंता होती तर मग पोरं नसते होऊ द्यायचे; बसायचं असतं वावरच कवटाळून मिठीत!''

''हाववं माय, बरोबर हाये तू म्हन्ती ते. पण तवा आमाले समजत नव्हतं नं ? तू कावून नवती आली व शिकवायले? म्या फलाण्याले उरावर नस्तं बसू देलं. नाईत मंग माय-अंग टाचून घेतलं आस्तं माहा...''

हा 'अलका' या शिक्षित-नागरी व्यक्तिरेखेचा आणि शेवंतामाय' या ग्रामीण-अशिक्षित स्त्रीचा दीर्घसंवाद स्त्रियांची भाषा समजून घेण्याच्या दृष्टीने उपयुक्त असा आहे.

शेवंतामाय ही 'स्त्रीत्वा'ला लगडून येणारी सगळी विशेषणे बाजूला सारून निखळ भाषा वापरते. एका अर्थाने तिने इथे पारंपरिक पुरुषसत्ताक व्यवस्थेला भाषेच्या द्वारा छेद दिलेला आहे; असे म्हणता येते. शेवंतामायच्या बोलण्यात वैदर्भीय लोकजीवनातील वाक्प्रचार, लोकोक्ती, प्रदेशविशिष्ट शब्दकळा, यांचा आधिक्याने वापर होतो. शब्द हे श्लील वा अश्लील असतात, हा प्रकारच तिच्या गावी नाही. वैदर्भीय बोलीच्या 'नमुना तपासणी'साठी शेवंतामायची भाषा उपयुक्त ठरते.

शेवंतामाय, धुरपदाबाई व 'बारोमास'मधून येणाऱ्या खेड्यातील अन्य प्रौढ स्त्रियांचा स्वभाव फटकळ आहे. त्या बडबड्या, तोंडाळ अशा आहेत. याची कारणे तेथील सामाजिकतेत दिसून येतात. खेड्यातील स्त्रियांना पुरुषांबरोबर मोकळेपणाने बोलता येत नाही. शिवाय त्यांचे पुरुषांसारखे सातत्याने परगावी जाणे-येणे देखील नसते. त्या सातत्याने शेती-घरकाम यात गुरफटलेल्या असतात. आत्मप्रकटीकरणासाठी अन्य साधने नसतात. मग या स्त्रिया धुण्यापाण्याच्या निमित्ताने पाणवठ्यावर, कामाच्या निमित्ताने एकमेकींच्या घरी वा शेतावर गेल्यास मोकळेपणाने बोलतात. शेवंतामाय फटकळ असली तरी ती सामाजिक संकेत नीटपणाने जाणून आहे. नवऱ्याला बोलावताना ती फलाणा, इठ्ठला वा मोठ्या मुलाचे नाव घेऊन बोलावते. एखाद्या गोष्टीची खात्री पटवण्यासाठी तिला ज्वारीची शपथ पुरेशी वाटते. बांबू चुलीत जाळणे हे अशुभ असते याची अलकाला कल्पना नसते. तेव्हा शेवंतामाय सुनेला ''येळू कवा जाळतात माईत हाये तुले? त याची तिल्डी करून मढं घालून मसणात नेलं की, मढ्यासंगं जाळतात येळू... इथं कोणाचं सरण जाळा लागली माय गंगे तू?''

अशाप्रकारे सामाजिक संकेत जपणारी शेवंतामाय पुरुषसत्ताक व्यवस्थेने तिच्यावर लादलेले भाषिक संकेत मात्र धुत्कारून लावते.

**आर्थिक वा जातीय स्तरानुसार भाषाभेद :** व्यक्तीचा आर्थिक-सामाजिक दर्जा हा भाषेवर परिणाम करत असतो. एखाद्या व्यक्तीची आर्थिक-सामाजिक स्थिती 'उच्च'

दर्जाची असेल; तर 'निम्न' दर्जाच्या व्यक्तीशी बोलताना तिच्या भाषेत उर्मटपणा येतो. आपण समोरच्यापेक्षा 'उच्च' स्थानी आहोत असा गंड तिच्या मनात कळत-नकळत येत असतो. जर हे उलट असेल तर त्या व्यक्तीच्या बोलण्यात अजीजी येते. बर्नस्टाइनने मांडलेला 'न्यून सिद्धांत' या संदर्भात महत्त्वाचा ठरतो. त्याने विस्तारित प्रयोगव्यवस्था आणि मर्यादित प्रयोगव्यवस्था असे भाषाभेद मानून उच्च व निम्न वर्गातील संभाषणात हा भेद कसा जाणवतो, ते सोदाहरण स्पष्ट केले आहे.

'बारोमास'मध्ये असा भाषाभेद आपणास दिसून येतो. दगडू महाकाळकडे कराराने असलेले शेत सोडवून घेण्यासाठी सुभानराव जेव्हा त्यांच्याकडे जातात, तेव्हाचा या दोघांचा संवाद आर्थिक स्तरभेदाच्या अंगाने लक्षणीय आहे. दगडू महाकाळ हा गावचा सरपंच तर आहेच; त्याशिवाय तो मोठा सावकार, व्यापारी आहे. त्याच्या तुलनेत सुभानराव दुर्बल आहे. संवाद असा-

''पण मोहोरपंप कावून सुरू हाय...'' सुभानराव.

''ऐरीच सुरू कराय लावली. पाण्याचा उपसा करून इहिरीचा ठाक कधी दिसते ते पाहून राह्यलो.'' महाकाळ.

''बुडाणी हाये सरपंच. आटतच नाई ती.''

''इहिरीचा तळ काय दिसणार नाही, त्याच्या बापाले दिसणं भाग हाये. एक तिथी चार मोटरी चालू करीन मी. मग न दिसलं? एकदा पाण्याचा अंदाज आला की ऊसच देतो दटावून समदा.''

''पण ऊस इकायले कुठी कारखाना हाये आपल्या गावात?''

''झ्याट मारी नाई इकला गेला ऊस तर.:.. देऊ फुकट वाटून लोकायले... ऊसाच्या उत्पन्नासाठी थोडाच काई लावायचा ऊस...''

''मग?''

''ऊसाले महामूर खत द्यायचं. चांगला दोन दोन पुरुष वाल्ढा पाह्यजे.अन् मंग त्या ऊसात लावायचा गांजा. एवढ्या वावरात लाखो रुपयांचा गांजा होईल. गांजाचं पीक काढून घेतलं की ऊस द्यायचा फुकट वाटून, नाईतं टाकायचा जाळून. काचाच्या बाटलीले दारू वाहून नेण्यापुरतंच महत्त्व असते, मग टाकतोच का नाई आपुन ती दगडावर आपटून टचकन फोडून.'' (बारोमास, २००२:३००)

महाकाळच्या वाक्याचा रोख आपण सत्ताधीश आहोत असा आहे; तर सुभानराव अतिशय अजिजीने त्याच्याशी संवाद साधतात. त्याच्या तुच्छतादर्शक वृत्तीबद्दल ते चकार शब्दही बोलत नाहीत. असाच आर्थिक स्तरानुसार भाषाभेदाचा अनुभव आमदार मालपाणी आणि एकनाथ यांच्यांत झालेल्या संभाषणात येतो. हा आमदार, त्याचा पी.ए., महाकाळ यांच्या शब्दात जरब, हुकूमत आहे. आर्थिक सत्तेमुळे त्यांच्या शब्दात मुजोरी





अनुक्रमणिका

येते. त्यामुळे ते हटकून कधी अशिष्ट, इंद्रियवाचक शब्द वापरतात.

**म्हणी व वाक्प्रचार यांची संदर्भनिष्ठता :**

म्हणी व वाक्प्रचार लोकजीवनातील भाषेचे अर्क असतत. ते एका पिढीकडून दुसऱ्या पिढीकडे चालत आलेले लोकभाषेचे संचित असते. या म्हणींना भौगोलिक - सामाजिक पर्यावरणाचे संदर्भ असतात. 'बारोमास'मधून अशा विविध संदर्भ घेऊन येणाऱ्या पन्नास ते साठ म्हणी आपल्या हाताशी लागतात. 'सांग पाटला काय करू? उपट पऱ्हाडी पेर गहू.', 'तुम्ही जात्यात, आम्ही सुपात', 'घरच्या भाकरी खाऊन मामाच्या शेळ्या वळणं', 'घरादारावर हाराळी फुटणे', 'सतरा कारभारी अन् जो तो पायखोरी', 'जाय घोड्या खाय हाराळी', 'तुमी तशा आमी, अन् नीट बसा मामी', 'हारिफळी बायजाबाई न बसायले जागा नाई', यांसारख्या विविध म्हणी, वाक्प्रचार ग्रामजीवनाचे शेती-पिके-प्राणी यांचे व्यक्तिमनातील प्रवृत्ती-अपप्रवृत्तींचे संदर्भ घेऊन येतात.

काही म्हणी, वाक्प्रचार हे ग्राम्यतादर्शक असे आहेत. मात्र ग्रामजीवनात शाब्दिक पातळीवर श्लील-अश्लील, शिष्ट-अशिष्ट असा फारसा भेद दिसत नाही. या संदर्भात 'बारोमास'मधील लोकोक्तीचा आधार घेता येतो. उदा० 'च्युत पाहून भूत लागते', 'पळत्या भुताचे शेपूट हाती लागल्यावर उपटून घेणे', 'खालून वर पांढरे होणे', 'वांझोट्या म्हशीला फळवणे' इत्यादी म्हणींचा अन्वयार्थ लक्षात घेण्याजोगा आहे. 'बारा वर्स तप केलं अन गाढवाशी पाप केलं' ही लोकोक्ती संत तुकारामांच्या 'एक ब्रह्मचारी गाढवा झोंबता । हाणुनिया लाथा पळाले ते ॥ गाढवही गेले । ब्रह्मचर्यही गेले ॥' या अभंगासी साधर्म्य सांगते.

काही हिंदी भाषेतील म्हणी देखील वऱ्हाडी बोलीत बेमालूम मिसळून गेल्या आहेत. 'खाया पिया कुछ ना, गिजास फोडा बाराणा', 'सौ बका, एक लिखा' आदी म्हणी हिंदीतून आलेल्या असल्या तरी संवादात पात्राच्या तोंडी त्या सहज येतात.

**भाषाद्वित्व व द्वैभाषिकता :** समाजातील भाषिक बहुविधतेचा अभ्यास करत असताना चार्ल्स फर्गसन याने 'भाषाद्वित्व' ही संकल्पना वापरली. 'बारोमास'मध्ये आपणास या भाषाद्वित्वाचा प्रत्यय येतो. कादंबरीचा नायक एकनाथ हा उच्चशिक्षित आहे. तो महाविद्यालयात मुलाखतीसाठी गेल्यावर, मोहाडीला आमदाराकडे वा सासरी गेल्यानंतर प्रमाणभाषा वापरतो. तर सांजोळला गावाकडे आल्यानंतर गावकरी, मित्रमंडळी, आईबाप यांच्या सोबत संवाद साधताना ग्रामीण **वैदर्भीय** बोली वापरतो. याचा अर्थ औपचारिक व्यवहारासाठी एकनाथ शिष्टमान्य भाषेचा प्रयोग करतो; तर कुटुंबात, मित्रात अनौपचारिक व्यवहारात त्याच्या बोलीभाषेचा वापर करतो. हेच 'भाषाद्वित्व' होय.

द्वैभाषिकतेची काही उदाहरणे देखील या कादंबरीत आढळतात. हिंदी-मराठी भाषासंपर्कातून येथे द्वैभाषिकता निर्माण होते.

''काय ठेकेदार! काय चालवलं तुमी हे?... आमच्या झाडाले कशी काय कुऱ्हाड लावली?'' एकनाथ.

'आरे आबा, एकनाथराव आदाब... कावूत येवढे खिजले मालक?'

'मालक आणि फलक गेले होंबळीत. पह्यले हे सांगा की ते झाड कसं काय तोडा लागले तुम्ही?'

'कैसे क्या, बोले तो क्या? ये मधुकररावने बेचे है हमे.'

'लेकिन हमसे कुछ पुछताछ? मुझे कुछभी मालूम नाही.'

'ये मुझे क्या पुछते भाई, तुम्हारे घर का मामला है.' (बारोमास, २००२ : १६७)

येथील एकनाथ आणि करीम ठेकेदार यांच्यातील हा संवाद भाषासंपर्काचा उत्कृष्ट नमुना आहे. तसेच सुरुवातीला मराठीतून बोलणारा एकनाथ अचानक हिंदीतून बोलायला लागतो. अशीच स्थिती करीम ठेकेदाराचीही होते. तोही आलटून पालटून मराठी-हिंदी भाषा बोलू लागतो. भाषाबदलाचे हे उदाहरण होय. परभाषेतून उसनवारी केलेले अनेक शब्द या कादंबरीत येतात. इंग्रजीतील अनेक वस्तू, स्थळे यांची नावे त्या स्वरूपात वा काही उच्चार सुलभ करून येतात. उदा० लाईन (विद्युत), स्प्रे, पोस्टमार्टेम, परमिशन, ॲडव्हान्स, बॅग, इ० अनेक शब्द मराठीत असे रुळले आहेत. हिंदी-उर्दूतील देखील जानजवान, सुकुट, वात, अनपढ, पैदा, सौदा, अवलाद, मर्द, आदी शब्द येतात.

**निष्कर्ष :** 'बारोमास' ही वैदर्भीय भौगोलिक - सामाजिक पर्यावरणातील एक महत्त्वपूर्ण कादंबरी आहे. विदर्भातील बोलीभाषेतील विविध संदर्भ घेऊन ही कादंबरी अवतरते. या भूभागातील व्यक्तींचे जगणे, त्यांची जगण्याची पद्धती, समूह जीवन, लोकसंस्कृती, मानवेतर सृष्टी, कास्तकारांचे जगणे, शेती, निसर्ग, पिके, अवजारे, शेतीची आधुनिक यंत्रे या संदर्भात बहुविध भाषिक भांडार या कादंबरीत आढळते.

**संदर्भग्रंथ :**


- देशमुख सदानंद, 'बारोमास', कॉन्टिनेन्टल प्रकाशन, पुणे - ३०, २००२.
- धोंडगे दिलीप, 'शैलीमीमांसा', शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, २००२.
- धोंगडे रमेश, 'सामाजिक भाषाविज्ञान', दिलीपराज प्रकाशन, प्रा०लि० पुणे २००६.
- पाटणकर जयश्री (संपा०), 'सामाजिक भाषाविज्ञान : कक्षा आणि अभ्यास', संदर्भ प्रकाशन, नाशिक. २००५.
- मालशे मिलिंद स०, 'आधुनिक भाषाविज्ञान; सिद्धान्त आणि उपयोजन', लोकवाङ्मय गृह प्रकाशन, मुंबई. आवृत्ती ३, नोव्हेंबर २००४.
- वरखेडे रमेश (संपा०), 'समाजभाषाविज्ञान : प्रमुख संकल्पना', शब्दालय प्रकाशन, श्रीरामपूर, आवृत्ती २, फेब्रुवारी २००१.


■

# दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोशाच्या निमित्ताने...

कृष्णा किरवले

महाराष्ट्र राज्याची स्थापना झाल्यावर मराठी भाषा, साहित्य आणि संस्कृती संवर्धनाच्या हेतूने शासकीय स्तरावर अनेक विभाग कार्यरत करण्यात आले. यामध्ये भाषा संचालनालय, मुद्रण व लेखनसामग्री संचालनालय, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, लोकसाहित्य मंडळ, मराठी विश्वकोश मंडळ यांचा निर्देश करता येईल.

मराठी भाषेच्या संवर्धनासाठी महाराष्ट्र शासनाचे उपरोक्त विभाग कार्यरत असतानाच राज्य मराठी विकास संस्था ही शासकीय पातळीवरील, परंतु स्वायत्त संस्था स्थापन करण्यात आली. मराठी भाषा संवर्धनासाठी शासकीय अडथळे येऊ नयेत हा हेतू लक्षात घेऊन या संस्थेची कार्यकक्षा ठरविली गेली. अशा या संस्थेने आजपर्यंत कोशनिर्मितीच्या संदर्भात केलेले कार्य लक्षणीय आहे. या संस्थेच्या माध्यमातून दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोशनिर्मितीचा हाती घेतलेला प्रकल्प मराठी भाषेच्या इतिहासात अत्यंत महत्त्वाचा आहे.

भारतीय संविधान स्वीकारल्यानंतर ग्रामीण आणि नागर परिसरातील उपेक्षित जातींच्या जीवनात बदलाची प्रक्रिया सुरू झाली होती. सर्वांसाठी शिक्षण, उपेक्षित जातीच्या उत्थानासाठी केलेल्या विशेष तरतुदी, शेतकरी अथवा अल्पभूधारकांना जमीन सुधारणा आणि संरक्षणासाठी केलेले प्रावधान, या सर्वांच्या परिणामातून गावगाड्यातील बारा बलुतेदार, अठरा आलुतेदार आणि गावकुसाच्या आतील विविध जातिसमूह यांच्याबरोबरच गावकुसाच्या बाहेरील अस्पृश्य, विमुक्त, भटके आणि आदिवासी या जातींपर्यंत प्रागतिकतेचे लोण पोहोचले गेले. या विविध जातिसमूहांना अस्तित्वाची जाणीव झाल्याने त्यांनी मराठी साहित्यनिर्मितीच्या प्रांतामध्ये पदार्पण केले होते. सामान्यतः ग्रामीण परिसरात ब्राह्मण आणि त्यांच्या पोटजाती, क्षेत्रीय अथवा मराठा आणि त्यांच्या पोटजाती, वैश्य आणि त्यांच्या पोटजाती, बारा बलुतेदार आणि अठरा आलुतेदार यांच्याबरोबरच महाराष्ट्र शासनाने मागास जातींच्या विकासाची निश्चित केलेली संख्या, यामध्ये एकूण अनुसूचित जाती ५९, अनुसूचित जमाती ४७, विमुक्त जाती १४, भटक्या जमाती २९, विशेष मागास वर्ग ४२, इतर मागासवर्गीय संख्या २९९ मिळून स्थूलमानाने ५०० पेक्षा अधिक जाती आहेत. या प्रत्येक जातीचे जातिगत व्यवसायानुरूप भाषिक व सांस्कृतिक वेगळेपण अस्तित्वात आहे. याशिवाय त्यांचे धार्मिक कुलाचार, उपासना

पद्धती, विवाह आणि मर्तिका संस्कार, राहणीमान, खाणेपिणे यांच्या विविध तऱ्हा अस्तित्वात आहेत.

१९६० नंतर उदयास आलेल्या दलित व ग्रामीण साहित्यातून उपरोक्त सामाजिक समूहांपैकी काहींनी केलेली वाङ्मयीन निर्मिती प्रमाण मराठी भाषा, मराठी शब्दसमूह आणि व्याकरणिक नियमांच्या परिघाबाहेरची होती व आहे. त्यामुळे प्रमाण मराठी भाषेमध्ये अस्तित्वात नसणारे शब्द रूढी, परंपरा, संस्कार आणि संस्कृती दलित-ग्रामीण साहित्यातून शब्दबद्ध झाली. परिणामत: प्रमाण मराठी भाषेच्या संस्कारात वाढलेला वाचक आणि अभ्यासक यांच्या आकलनाला मर्यादा पडल्या. सदरच्या अभ्यासकांना पारंपरिक ग्रामीण गावगाडा, प्रदेशभिन्नत्वे प्रादेशिक ग्रामीण जीवन, संस्कृती आणि बोलीचे वेगळेपण, दलितांतील विविध जाती, आदिवासींचे समाजजीवन, त्यांची बोली आणि संस्कृती यांचा परिचय नसल्याने दलित व ग्रामीण कलाकृतीचा आस्वाद घेणे शक्य नव्हते. ही अडचण विचारात घेऊन डॉ० गंगाधर पानतावणे यांनी राज्य मराठी विकास संस्थेला दि० ५ जुलै १९९४ला दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोशाचा प्रकल्प सादर केला होता. मात्र या प्रकल्पाच्या कामाला प्रामुख्याने २००३ नंतरच सुरुवात केली गेली.

दलित-ग्रामीण साहित्य शब्दकोशांचे वेगळेपण असे की हा कोश म्हणजे केवळ शब्दांचे अर्थ देण्यासाठी नाही, तर तो शब्द ज्या साहित्यकृतीतून शोधून काढला आहे, त्या साहित्यकृतीतील मूळ वाक्यरचना उद्‌धृत करून तेथे त्यांचा अर्थ लावला आहे. त्यामुळे ओघाने शब्द, त्यांचा अर्थ, मूळ वाक्य, कलाकृतीचे नाव, वाङ्मयप्रकार, कलावंताचे नाव आणि शब्दाचा पृष्ठक्रमांक दिलेला आहे. या साहित्य शब्दकोशासाठी प्रारंभी १९५० ते २०००पर्यंत प्रकाशित झालेल्या दलित व ग्रामीण साहित्यकृती विचारात घेण्याचा निर्णय घेतला होता. मात्र ही मर्यादा नंतर २००५ पर्यंत वाढविण्यात आली. त्यामुळे ह्या शब्दकोशनिर्मितीसाठी साडेसहा हजार दलित-ग्रामीण साहित्यकृतींचा अभ्यास करून कोशनिर्मिती केली आहे. त्यासाठी स्थूलमानाने खालील निकष ठरविले होते.

(१) साहित्यकृतीत परिचित असलेला अथवा इतर शब्दकोशांत अर्थ दिलेला शब्द विचारात घेतला नाही.

(२) लेखकांनी तळटिपेमध्ये शब्दांचा अर्थ दिला असेल तर तो शब्द विचारात घेतला नाही.

(३) इंग्रजी शब्दांची मोडतोड करून किंवा उर्दू, संस्कृत, कन्नड, तेलुगू, पर्शियन इत्यादी भाषांतून शब्द घेतलेला असेल तर त्याचा शब्दकोशात अंतर्भाव केला नाही.

(४) साहित्यकृतीची केवळ पहिली आवृत्ती विचारात घेतलेली आहे. कारण दुसऱ्या आवृत्तीमध्ये लेखकाने शब्दाचे अर्थ दिले आहेत किंवा ते शब्द गाळून नवीन शब्द दिले आहेत.

(५) एकच शब्द वेगवेगळ्या प्रदेशात भिन्नभिन्न अर्थाने वापरलेला जात असल्याने ती साहित्यकृती ज्या प्रदेशातील असेल तो अर्थ विचारात घेतलेला आहे.

दलित-ग्रामीण शब्दकोशासाठी साडेसहा हजार साहित्यकृतींतून संकलित केलेल्या शब्दांचे अर्थ लावण्यासाठी डॉ० गंगाधर पानतावणे यांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्राच्या विविध प्रदेशातील लेखक, तज्ज्ञ अथवा भाषाअभ्यासक यांनी अथक परिश्रम घेतले. २००३ पासून चालू असलेल्या या प्रकल्पात काम करणाऱ्यांमध्ये डॉ० मधुकर वाकोडे (अमरावती), योगीराज वाघमारे (सोलापूर), डॉ० कृष्णा किरवले (कोल्हापूर), डॉ० शशिकांत सावंत (उज्जैन), डॉ० अमिताभ (मुंबई), डॉ० किसन पाटील(जळगाव), डॉ० चिंतामण कांबळे (मूर्तिजापूर), डॉ० संजीवकुमार सोनवणे (धरणगाव) यांचा सहभाग होता. अगदी अलीकडे प्रा० शंकर सखाराम (अलिबाग), ऊर्मिला पवार(मुंबई), डॉ० निळकंठ शेरे (अलिबाग), इत्यादींना सहभागी करून घेतले गेले.

या साहित्यशब्दकोशाच्या निर्मितीमुळे ग्रामीण-दलित साहित्यकृतींचा आस्वाद घेणे सुलभ झाले, एवढीच घटना महत्त्वाची नसून मराठी भाषेला दलित आणि ग्रामीण साहित्याने महत्त्वाचे शब्दभांडार उपलब्ध करून दिल्यामुळे मराठी भाषेच्या विकासात किती मौलिक भर घातली आहे, याची प्रचीती ही येते. राज्य मराठी विकास संस्थेने या प्रकल्पातील दलित-ग्रामीण शब्दकोशाचा प्रथम खंड प्रसिद्ध केलेला आहे. या खंडात केवळ 'अ' ते 'घ' या वर्णमालेतील शब्दांचाच अंतर्भाव असून 'च' ते 'ज्ञ' या वर्णमालेतील शब्दांच्या अर्थनिश्चितीचे काम अजून चालू आहे. किमान पुढील तीन खंड प्रकाशित होण्याची शक्यता आहे. महाराष्ट्र शासनाने या प्रकल्पासाठी राज्य मराठी विकास संस्थेच्या माध्यमातून भरीव अर्थसहाय्य पुरविल्यामुळेच हा प्रकल्प सिद्धीस गेला याचा उल्लेख करणे गरजेचे वाटते. या शब्दकोशनिर्मितिप्रक्रियेत काही वेळा शब्दाचा अर्थ लावणे तज्ज्ञ मंडळींना शक्य होत नव्हते, अशावेळी संबंधित लेखकांशी दूरभाषद्वारे संपर्क साधला जाई, मात्र संबंधित लेखकालाही आपण उपयोगात आणलेल्या शब्दांचा अर्थ सांगता येत नव्हता. त्यामुळे उलटसुलट चर्चेतून अर्थनिश्चितीचे काम केले जाई. बऱ्याच साहित्यकृतींमध्ये मुद्रणदोष तसेच राहिलेले होते. मुद्रणदोष आहे की नवीन शब्द आहे याचा निर्णय घेणे अवघड होई. या शब्दकोशामध्ये आलेल्या काही शब्दांची उत्पत्ती शोधण्याचा प्रयत्न केला असता, त्या शब्दांची उत्पत्ती संस्कृत ऐवजी पाली, प्राकृत आदी भाषांमध्ये असल्याचे जाणवले. या शब्दकोशाने भाषाभ्यासकांच्यापुढे शब्दाची उत्पत्ती शोधण्याचे नवे आव्हान निर्माण केले आहे, हे नमूद करावेसे वाटते.

■

# बोली : काही समज, काही आक्षेप

सुधीर रा. देवरे

अनेक लोकांचे बोलीभाषेबद्दल काही समज आहेत. काही अपसमजही आहेत. समाजात फक्त प्रमाणभाषा असाव्यात. बोलीभाषा नकोत. भाषा जेवढ्या कमी असतील तेवढे दळणवळण सुलभ होईल, असा त्यांचा भाबडा समज असतो. 'एक देश, एक भाषा' असा नाराही एकेकाळी गाजला आहे. आपली भाषा सोडून इतर भाषा वा बोलींबद्दल असे मत मांडणे एखाद्या तथाकथित अभ्यासकाला शोभून दिसेल ज्या अभ्यासकाचा एखादी बोली बोलणाऱ्या लोकांशी कधी कोणताही संबंध येत नाही, बोलीतले अपरिहार्य लोकजीवन ज्या अभ्यासकाला माहीत नाही ! जेव्हा एखाद्या व्यक्तीला वा गटाला एका विशिष्ट बोलीव्यतिरिक्त कोणतीही भाषा बोलता येत नाही आणि तरीही ती भाषा वाळीत टाकली जाते व त्या गटाला विशिष्ट भाषा बोलायला वा शिकायला भाग पाडले जाते, तेव्हा खरे तर ही माणसाच्या अस्तित्वालाच सुरूंग लावणारी घटना ठरते. कोणीतरी आपली जीभ कापून टाकतेय, असा हादरवून टाकणारा हा अनुभव असतो.

विशिष्ट भौगोलिक परिसरातल्या बोली त्या क्षेत्रातील प्रमाणभाषा बोलणाऱ्या लोकांना थोड्याफार कळतात. अहिराणी भाषा सुद्धा अनेक मराठी लोकांना कोणत्याही अडचणीशिवाय कळते. काही पारिभाषिक शब्दांची अडचण येऊ शकते; पण एकूण मथितार्थ कळतो. मी संपादित करीत असलेले अहिराणी माध्यमातील 'ढोल' हे नियतकालिक आणि माझे अहिराणी लेख, पुस्तके महाराष्ट्रभर आणि बाहेरही सर्व चोखंदळ मराठी वाचकांना समजतात. याचा उल्लेख मी इथे मुद्दाम करीत आहे.

चौथ्या अहिराणी साहित्य संमेलनात नाशिकच्या मराठी लोकांनाही माझे अहिराणी भाषण समजावे म्हणून मी भाषणाची रचना सोप्या अहिराणीत केली होती. आता सोपी अहिराणी म्हणजे काय, यावरही नवा आक्षेप येण्याची शक्यता असल्याने त्याचे स्पष्टीकरण आत्ताच देऊन ठेवतो. जशी सोपी मराठी, अवघड मराठी; सोपी हिंदी; अवघड हिंदी, सोपी इंग्रजी, अवघड इंग्रजी अशी आपण वर्गवारी करतो त्या अर्थाने सुलभ अहिराणी ही संज्ञा मी येथे वापरतो आहे.

दुसरे उदाहरण देतो. राम गणेश गडकरी यांच्या 'भावबंधन' नाटकातील भाषा मराठी आणि ग०दि० माडगूळकर यांच्या कवितेची भाषाही मराठी. एक समजायला कठीण. दुसरी समजायला सोपी. भाषा ह्या प्रवाहासारख्या असतात. प्रवाहात नदीचे

पात्र जसे पुढे विस्तृत होत जाते तसे भाषेचे असते. भाषा एकच असली तरी आजची भाषा कालच्या भाषेपेक्षा वेगळी असते. उदाहरणार्थ, संत ज्ञानेश्वरांची मराठी, शिवाजी महाराज, संत तुकाराम यांची मराठी, महात्मा फुले यांची मराठी, चिपळूणकरांची मराठी आणि आजची मराठी यात जसे काही बाबतीत साम्य नाही तसे अहिराणीत आज आदिमपण दिसणार नाही. तसे कोणत्याच बोलीभाषेत आदिमपण दिसणार नाही.

आदिम, प्राचीन, आर्ष या संज्ञा मी अहिराणीच्या वा कोणत्याही बोलीभाषेच्या संदर्भात वापरत नाही. माझ्या लेखाचा तो कधी विषयसुद्धा करत नाही. पण मध्यंतरी एका अभ्यासकाने अहिराणी ही आदिम बोली आहे का? हा प्रश्न मला विचारला होता. माझ्या कोणत्याही लेखात तसा उल्लेख नसताना! केवळ अहिराणीच नव्हे, तर बहुतेक बऱ्याच बोली या आदिम आहेत. नैसर्गिक क्रमानुसार आधी बोली निर्माण होतात आणि मग प्रमाणभाषा. विशिष्ट भौगोलिक क्षेत्रातील एकमेकांना लागून असलेल्या विविध बोलींच्या सरमिसळ मानवी व्यवहारातून प्रमाणभाषा निर्माण होत असतात.

आज भाषेतील फक्त शब्दांचे आदिमपण सांगता येते. संपूर्ण भाषेचे आदिमपण दाखवता येत नाही. कारण अनेक भाषांच्या आदान-प्रदानातून सगळ्याच भाषा एकमेकांना पूरक होत राहतात. मी ज्या अभ्यासकाचा उल्लेख केला त्यांनीच संस्कृत आदिम भाषा आहे हे सांगताना संस्कृतमधील विष्णु हा असा एकच शब्द सांगितला की ज्याची व्युत्पत्ती सांगता येत नाही. आणि संस्कृतमधील या एका शब्दाची व्युत्पत्ती सांगता येत नाही म्हणून त्यांच्या मते संस्कृत ही समग्र भाषा आदिम ठरते. अहिराणीचे आजही असे शंभर शब्द सहज सांगता येतील की ज्याची व्युत्पत्ती लावता येत नाही. त्या शब्दांचे नैसर्गिक स्रोत दाखवता येत नाहीत. तरीही अहिराणी ही आदिम भाषा आहे, असा दावा करणे, मी अप्रस्तुत समजतो.

अहिराणी भाषेत प्रचलित मराठी शब्दांची अवशेष-रूपे दिसतात, हे खरे आहे. आज अहिराणी बोली बोलणारे लोक पहिलीपासून मराठीत शिक्षण घेतात. त्यामुळे अहिराणीमध्ये मराठी शब्द आज प्रचंड प्रमाणात रूढ झाले आहेत. जेव्हा एखादी बोली प्रमाण भाषेच्या प्रभावाखाली येते तेव्हाच तिचे अर्वाचिनीकरण होणे सुरू होते. शब्द, व्याकरण आणि लिपी या गोष्टी प्रमाणभाषेकडून उसन्या घेतल्या जातात. अहिराणीला स्वतंत्र लिपी नसल्याने अहिराणी-लेखन मी मराठी म्हणजे देवनागरी लिपीत लिहिले. उपलब्ध मराठी लिपीत अहिराणी लिहिल्यामुळे तिचे दृश्य रूपच मराठी दिसते तर मग ती आदिम कशी वाटेल? आणि ती आदिम आहे की नाही यावर चर्चा कशासाठी?

भाषेत जसे शब्दांचे आदानप्रदान होत राहते, तसे व्याकरणाचेही होत असते. याचे एकच उदाहरण देतो. मराठी व्याकरणानुसार वाक्याची सुरुवात *आणि* या संज्ञेने होत नाही. *आणि* ही संज्ञा वाक्याच्यामध्ये येत असते. पण इंग्रजी व्याकरणानुसार वाक्याची

सुरुवात (अँड) *आणि* ने होते. मात्र अलीकडच्या काळात मराठीतही *आणि* ने सुरुवात होणारी वाक्ये लेखकांकडून सहज लिहिली जातात. संशोधनात्मक प्रबंधांतही अशी वाक्ये येत आहेत. हे इंग्रजी भाषकांकडून व्याकरणाचे आदान आहे. याचा अर्थ मराठी भाषेला इंग्रजी व्याकरण आहे असे जसे म्हणता येणार नाही तसे अहिराणीला पूर्णपणे मराठी व्याकरण आहे, असे म्हणता येणार नाही.

ज्या प्राचीन भाषा इतर भाषांच्या संपर्कात आल्या नाहीत त्यांचे आदिमपण आजही टिकून आहे. उदाहरणार्थ, अंदमान बेटावरील जारवा या आदिम माणसांची भाषा आज आदिम-प्राचीन-आर्ष म्हणता येईल. कारण जारवा ही जमात इतर लोकांच्या संपर्कात अजूनही आलेली नाही. ज्या बोली इतर भाषांच्या संपर्कात आल्या त्यांचे प्राचीनत्व त्यांच्यातील काही शब्दांवरून ठरवता येते; भाषेवरून नाही.

जिथे शब्द फक्त हुंकाराचे काम करतात अशा प्राचीन भाषांना अगदी सुरुवातीच्या काळात व्याकरण नसते. मात्र भाषेत वाक्ये यायला लागली की व्याकरण येतेच. म्हणून प्रत्येक भाषेला व्याकरण असते. बोलीभाषांना व्याकरण नसते हा समज चुकीचा आहे. त्या बोलीभाषेचे व्याकरण आतापर्यंत कोणी लिहिले नसेल. व्याकरण समजून सांगितले नसेल, अथवा त्या भाषेतल्या व्याकरणाचे पुस्तक प्रकाशित झाले नसेल; पण त्या बोलीला व्याकरणच नाही असे म्हणता येणार नाही.

परंपरेने चालत आलेल्या नैसर्गिक लोकबोली वेगळ्या आणि पिजीन-क्रिऑल या कृत्रिम तयार झालेल्या बोली वेगळ्या. बोलींपासून व्यावहारिक प्रमाणभाषा तयार होतात. मात्र पिजीन-क्रिऑलसारख्या कृत्रिम बोली या प्रमाणभाषेपासून तयार होत असतात. उदाहरणार्थ, मुंबईची हिंदी बोली ही अनेक प्रमाणभाषांच्या संकरातून तयार झालेली क्रिऑल भाषा आहे. (काही गुप्त व्यवहारांसाठीही कृत्रिम सांकेतिक भाषा तयार केल्या जातात. त्यांनाही बोली म्हणता येत नाही.)

एक अभ्यासक मला म्हणाले की, बोली सुधारल्या तर मराठी सुधारेल असे तुम्हाला का वाटते? हा प्रश्न ऐकून चक्रावण्याची वेळ आली. असे मी आतापर्यंतच्या माझ्या लिखाणात कुठेच म्हटलेले नाही. बोली मुळीच सुधारायच्या नाहीत. उलट बोली जशा आहेत त्याच स्वरूपात त्या वाचवायच्या आहेत. इतर भाषेतील शब्दांऐवजी मूळ भाषेतील शब्द सापडत असतील तर बोलीत ही दुरुस्ती नक्कीच करायला हवी. बोली वाचवल्या तर प्रमाणभाषा टिकतील आणि सकस समृद्ध होतील हे मात्र खरे आहे. हे मी वेळोवेळी म्हटले आहे.

अहिराणी ही अहिर लोकांचीच भाषा आहे, हे कशावरून? हा एक आक्षेप. अभिर लोकांचा एक समूह होता जो नैर्ऋत्येकडून आला, असे इतिहासकारांनी आधीच नमूद करून ठेवलेले आहे. 'अभिर'चा अपभ्रंश नंतर अहिर झाला. अहिर हे एका विशिष्ट





अनुक्रमणिका

जातीचे नव्हते. म्हणून आजही अहिर कुणबी, अहिर सोनार, अहिर लोहार, अहिर शिंपी अशा सर्व जातीत अहिर हे कूळ आढळते. अहिर लोकांची भाषा ती अहिराणी. आणि तेव्हापासून म्हणजे तिच्या उगमापासूनच ती लोकभाषा आहे. अहिराणी ही विशिष्ट जातीची भाषा नाही.

लोकदेव म्हणजे काय हे सुद्धा अनेक लोकांकडून विचारले गेले. पण भाषणातील विवेचनावरून ते सहज लक्षात येते. लोकांनी लोकांसाठी तयार केलेला तो लोकदेव. लोकदेव हा लोकांचा साधासुधा देव असतो. लोकांचे अन्न ते त्याचे अन्न. लोकांचे कपडे ते त्याचे वस्त्र. म्हसोबा, आसरा, मुंजोबा, वाघदेव, नागदेव, खांबदेव, पिरोबा, खंडोबा, डोंगरदेव, कन्सरा माउली आदी अहिराणी पट्ट्यातील लोकदेव आहेत. आणि या लोकसंस्कृतीतून लोकभाषा घडत असते.

शेवटी, एका अभ्यासकाने जे काही म्हटले आहे त्या आक्षेपाला काय उत्तर द्यावे, हे मला सुचत नाही. बोलीभाषा टिकवल्या पाहिजेत, त्या मरू देता कामा नयेत. त्यांचे संगोपन करणे, त्यांचे डॉक्युमेंटेशन करणे, बोलीभाषा बोलणाऱ्या लोकांना समजून घेणे आदी प्रकारच्या सर्व कामाला त्यांनी प्रतिगामी ठरवले आहे. आणि बोलीभाषा मारून प्रमाणभाषेकडे जाणे म्हणजे त्यांना पुरोगामी वाटते. अशी संकुचित टीका याआधी मी कधीच ऐकली नव्हती. पण अशा विचारांचे लोकही आहेत हे लक्षात येत होते. अशा विचारांच्या लोकांनी मराठी भाषेत तरी का बोलावे आणि मराठीत का लिहावे? कारण मराठीसुद्धा महाराष्ट्रापुरती एक बोली भाषाच आहे. या बोलीभाषेत व्यवहार करून प्रतिगामी ठरण्यापेक्षा त्यांनी जागतिक भाषेत म्हणजे फक्त इंग्रजीत व्यवहार करून पुरोगामी असणे इष्ट ठरेल!

याचे उत्तर कदाचित ते देतील की मराठी ही आमची मातृभाषा आहे म्हणून आम्ही ती उपयोजित करतो. मग वेगवेगळ्या बोली बोलणाऱ्यांची आणि बोलीभाषा जतन करणाऱ्यांचीही तीच भूमिका आहे, हे त्यांच्या लक्षात का येत नाही?

(दिनांक ३ व ४ डिसेंबर २०११ला नाशिक येथील महाकवी कालिदास कला मंदिरात आयोजित अ०भा० चौथ्या अहिराणी साहित्य संमेलनातील 'अहिराणी बोली : सामाजिक अनुबंध' या विषयाच्या परिसंवादातील माझ्या अध्यक्षीय भाषणावर नंतर ज्या प्रतिक्रिया आल्या - काही आक्षेप घेतले गेले, त्यांचे निरसन म्हणजे हा लेख आहे.)

■



अनुक्रमणिका

# मालवणी बोलीचे मराठी साहित्यातील उपयोजन

गोविंद काजरेकर

बोली आणि प्रमाणभाषा यांचे संबंध परस्परपूरक असतात. लोकसमूहांच्या दैनंदिन जीवनव्यवहाराचे साधन म्हणून प्रचलित असलेल्या बोली प्रमाणभाषेला समृद्ध करीत असतात. बोलीला क्षेत्रमर्यादा असते. तर प्रमाणभाषा ही शासनाने राज्यकारभार, ज्ञानदान इत्यादी गरजांपोटी संपूर्ण राज्यासाठी अधिप्रमाणित केलेले भाषारूप असते. तसे पाहता सर्वत्र बोलीचाच वापर होत असतो. मात्र लेखनव्यवहार प्रमाणभाषेतून केले जातात. उच्चार आणि लेखन यात मूलतः फरक असल्यामुळे उच्चाराबरहुकूम लिहिता येत नाही. लेखन हे प्रमाणित केलेल्या लेखनरूपांप्रमाणे म्हणजेच लेखननियमांप्रमाणे लिहावे लागते.

साहित्य ही जीवनवेधी कला असल्यामुळे तिचा लेखनफलक हा नेहमीच विशिष्ट प्रदेश असतो. अर्थात प्रत्येक प्रदेशावर बोलीचा कमीअधिक प्रभाव असतो. महानगरासारखे प्रदेश विचारात घेतल्यास तेथेही प्रमाणभाषाच बोलली जाते, असे नसून उच्चभ्रूंची वस्ती, मध्यमवर्गीयांची वस्ती आणि फूटपाथ वा झोपडपट्टीची ठिकाणे येथे भिन्न भिन्न भाषारूपे पाहावयास मिळतात. महानगरे सोडून ग्रामीण भागाकडे आपण वळतो तेव्हा मात्र प्रमाणभाषेपेक्षा बोलीचे प्राबल्य अधिक असते. किंबहुना त्या प्रदेशातील लोकसमूहाची ती व्यवहाराची व विचारविनिमयाची भाषा असते. साहित्यलेखन करताना मात्र व्यापकपणे मोठ्या वाचकवर्गाचा विचार करून लेखन केले जाते, त्यामुळे बोलीचा वापर तारतम्याने आणि जाणीवपूर्वक केला जातो. कारण त्यातून आकलनाबाबतचे काही प्रश्न उभे राहू शकतात. असे असले तरी काही लेखक बोलीचा वापर करून साहित्यलेखन करतात. त्यामागे अनेक कारणे असतात. प्रस्तुत लेखात मराठी साहित्यात मालवणी बोलीचे उपयोजन कसे झाले आहे, याचा विचार करावयाचा आहे.

मराठी भाषेच्या प्रमुख बोली म्हणून अहिराणी, वऱ्हाडी, वारली, झाडी आणि कुडाळी किंवा मालवणी या बोलींचा उल्लेख केला जातो. त्याचबरोबर हळबी, चंदगडी, डांगी, गोवारी, बालाघाटी, महारी असे अनेक पोटभेद मराठी प्रमाण भाषेबाबत सांगितले जातात. यातील मालवणी किंवा कुडाळी ही बोली दक्षिण कोकणातील दोडामार्ग सावंतवाडी ते मालवण, देवगड अशा किनारपट्टीच्या प्रदेशात बोलली जाते. संपूर्ण सिंधुदुर्ग जिल्हा आणि रत्नागिरी जिल्ह्याचा दक्षिण भाग या बोलीच्या प्रभावाखाली येतो. मच्छिंद्र कांबळी यांच्या मालवणी नाटकांमुळे ही बोली सर्वपरिचित झाली. तथापि त्याआधी अनेक





अनुक्रमणिका

साहित्यिकांनी मालवणी बोलीचे कमीअधिक प्रमाणात उपयोजन केलेले दिसते. प्रस्तुत लेखात याचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आहे.

समग्र मराठी भाषेचा विचार करता अगदी ज्ञानेश्वरांच्या ज्ञानदेवीमध्ये काही मालवणी शब्दांचा वापर केलेला दिसतो. 'वेंचिति चकोर तलगे अमृतकण कोवळे' या ओळीतील तलग हा शब्द मालवणी बोलीत कोंबडीचे अंड्यावर न आलेले पिल्लू या अर्थाने वापरला जातो. किंवा 'माजो जीव हिवान मेलो माका नंदाचो फडको दी' असे उद्‌गार काढणारी संत नामदेवांची बहुभाषिक गवळण भेटते. मात्र हे अपवादच ठरतात. आधुनिक काळात महात्मा गांधींच्या खेड्यांविषयीच्या विचारांतून बोलीकडे पाहण्याची दृष्टी बदलली आणि या बोलीचा वापर मराठी साहित्यात प्रारंभी तुरळक प्रमाणात होऊ लागला. साधारणत: १९२५च्या नंतर मराठी साहित्यात मालवणी बोलीचा वापर ग०ल० ठोकळ, र०वा० दिघे इत्यादी लेखकांनी केलेला दिसतो. मात्र वि०स० खांडेकर हे बराच काळ कोकणात वास्तव्याला असूनही त्यांच्या लेखनात मालवणी भाषेचा वापर झालेला दिसत नाही. 'क्रौंचवध' या कादंबरीला कोकणची पार्श्वभूमी असूनही त्यांच्या कादंबरीतील नायक दिलीप, नायिका सुलोचना अशी सारीच पात्रे प्रमाणभाषेत बोलताना दिसतात. कदाचित शिक्षकी पेशा, ब्राह्मणी संस्कार आणि भाषिक शुद्धतेच्या तथाकथित दृष्टिकोनामुळे खांडेकर बोलीच्या उपयोजनापासून दूर राहिले असावेत. मात्र ठोकळ आणि विशेषत: र०वा० दिघे यांनी मात्र 'आई शेतात आहे', 'पाणकळा' इत्यादी कादंबऱ्यांतून प्रारंभीच्या काळात मालवणी बोलीने संस्कारित झालेली भाषारूपे वापरलेली दिसतात.

पुढल्या काळात विठ्ठल कृष्ण नेरूरकर यांनी काही कविता मालवणी भाषेतच लिहिलेल्या दिसतात. ते महाराष्ट्रात रुजलेल्या मनिऑर्डर संस्कृतीचे चित्र रेखाटताना लिहितात की,

*'ठेय झिला घराची आठव रे ऽऽ  पाच तरी रुपये पाठव रे ऽऽ'*

मुंबईला नोकरीच्या निमित्ताने गेलेल्या मुलाला त्याचा गावातील बाप पैसे पाठवण्यास सांगतो. त्याचे हे म्हणणे नेरूरकरांनी थेट बोलीतूनच व्यक्त केलेले दिसते. किंवा *'चल चेडवा पाडावात्सून आगबोटीत जपान'* या नेरूरकरांच्या कविता त्या काळी आकाशवाणीवरही गाजलेल्या दिसतात. या गीतांना लोकगीतांची लय दिसते. पुढे स्वातंत्र्याच्या आगेमागे नवसाहित्याचा उदय झाला. त्यातून ग्रामीण साहित्य ही संकल्पना मूळ धरू लागली. व्यंकटेश माडगूळकरांनी आपला लेखनफलक म्हणून ग्रामीण प्रदेशाची निवड केली. त्यामुळे ग्रामीण जीवनानुभवांकडे पाहण्याची नवी मर्मदृष्टी निर्माण झाली. स्वातंत्र्योत्तर काळातील या ग्रामीण साहित्यनिर्मितीच्या प्रभावकाळापासून कथा-कादंबरी या कथनात्मक लेखनप्रकारांसह कविता, नाटक अशा सर्वच साहित्यप्रकारांत मालवणी बोलीचे उपयोजन होऊ लागलेले दिसते.

कथा-कादंबरीमध्ये श्री०ना०पेंडसे, गो०नी०दांडेकर, मधु मंगेश कर्णिक, हमीद दलवाई, आ०ना० पेडणेकर, चिं०त्र्यं० खानोलकर, जयवंत दळवी, प्र०श्री० नेरूरकर, हरिहर आठलेकर, ल०ना० केरकर, दिवाकर कांबळी, माधव कोंडविलकर तसेच नव्या पिढीतील कथा कादंबरीकार जयंत पवार, प्रवीण बांदेकर इत्यादी. तर कवितेमध्ये विंदा करंदीकर, वसंत सावंत, महेश केळुसकर, दादा मडकईकर, नामदेव गवळी, अनिल धाकू कांबळी, अजय कांडर इत्यादी कवींनी कमीअधिक प्रमाणात मालवणी बोलीला आपल्या लेखनात प्राधान्य दिले आहे. नाट्यलेखनात गंगाराम गवाणकर यांनी मात्र मालवणी बोलीच्या उपयोजनाचा कळसाध्याय साधलेला दिसतो. मच्छिंद्र कांबळींसारखा रांगडा, बोलीची सर्व सामर्थ्ये लीलया पेलणारा कलावंत भेटल्यामुळे नाट्यमाध्यमातून मालवणी बोली जगभर पोहोचली. राजा मयेकर, उषा परब यांनीही काही प्रमाणात या बोलीचे माध्यमरूप वापरलेले दिसते. या लेखकांच्या उपयोजन वैशिष्ट्यांचा विचार करण्याआधी बोली उपयोजनाच्या शक्यतांचा थोडक्यात विचार करता येईल.

बोलीउपयोजनांचा विचार वेगवेगळ्या अंगाने करता येणे शक्य आहे. जसे की, प्रमाणभाषेबरोबर केवळ संवादासाठीच बोलीचा वापर करणे, काही खेडवळ पात्रे चित्रित करून त्यांच्या तोंडची विधाने बोलीमाध्यमातून सादर करणे आणि संपूर्ण साहित्यकृतीसाठी बोलीचा वापर करणे, तसेच प्रमाण व बोली यांचे बेमालूमपणे केलेले मिश्ररूप वापरणे इत्यादी प्रकार या बोली उपयोजनात संभवतात. बोलीचा वापर केवळ विनोदनिर्मितीसाठी केला आहे की जीवनदर्शनाचा अपरिहार्य भाग म्हणून केला आहे; याचाही विचार या अनुषंगाने करावा लागेल. तसेच म्हणी, वाक्प्रचार, लोकगीते, लोकसंकेत, लोककथा यांच्यामुळे बोलीचे सौंदर्य सिद्ध झालेले असते. त्यामुळे यांचा निवेदनासाठी चपखल वापर करणे हे एक लेखकाचे कौशल्य असते. विशेष म्हणजे मालवणी ही बोली वर उल्लेखलेल्या प्रदेशातील बोलीरूप असली तरी तिच्यातील उच्चारप्रक्रिया जातिसमूहांप्रमाणेही बदलताना दिसते. त्या त्या लेखकाच्या लेखनाची महत्ता तपासण्यासाठी हे विवेचन उपयुक्त ठरू शकते.

कवितेतील मालवणी बोलीरूपांचा शोध घेता असे दिसते की, बोलीरूपाला प्राधान्य देऊन कवींनी कविता लेखन केलेले दिसते. वसंत सावंत यांची 'साळचा शिमगा देवचार : एक नादचित्र, कळयारो, झकारो, तुयां असो सप्नात येतस, आझम माझन' इत्यादी कवितांतून मालवणी बोलींचा वापर केलेला दिसतो. सावंत यांची 'देवचार' ही कविता वगळल्यास अन्य कविता प्रेम या भावनेचा आविष्कार करतात. 'कळयारो' या कवितेत सावंत लिहितात-

*न्यहत तुयां न्हायत आसतंय* *डेगेर मियां भिजतंय*
*चोरून चान्ना बघतंय* *थयच खिळान रचतंय*

*दिसा काय राती काय* *तुयाच माकां दिसतंय*
*जीव माजो अर्दो जालो* *अर्दो तुका दिलो*
*गावात बॉंब जंयथंय* *कबूल, माजो गुन्नो जालो* (सागरेश्वर, पृ०८)

आ०ना० पेडणेकर यांनी आपल्या 'कोकणातील हमीदा एसटीडीवरून' या एकमेव कवितेत मुस्लिम समाजात वापरण्यात येणारे मालवणीचे मिश्ररूप उपयोजिलेले दिसते.

*मुंबयमधी बॉंब फुटतत लोकां बोलतत कायबाय*
*आपुनकडून खूशखबरी मेळ्ळी नाय*
*पोस्टामधी खत तुमचा जळ्ळा तर नायं मां?*
*उधर जिवाय सामाळून ऱ्हवा...*
*इधर मुलुकमंदी तकलीफा हायतच*
*दुसरीकडून, आपले आदमी लोगोंकडूनबी*
*दोपारच्या वक्ताला, सांजेवक्ताक*
*पिसाबला जातानाबी*
*कोनचा भरोसा नाय ऱ्हायला आता*

(आ०ना० पेडणेकरांच्या कविता, पृ० १४३)

मालवणी बोलीचे हे भूसांस्कृतिक वैशिष्ट्य असे की, ही बोली जातिसमूहांनुसार विभिन्न रूपांत दैनंदिन जीवनात वापरली जाते. कोकणातील मुस्लिम समाजात मालवणी आणि हिंदीचे एक मजेशीर मिश्ररूप पाहावयास मिळते. वरील कवितेला हिंदु मुस्लिम समाजातील संघर्षाची पार्श्वभूमी आहे. मात्र तिचे बोलीरूपच प्रभावी असलेले दिसते. मेळ्ळी, जळ्ळा, सांजेवक्ताक, व्हळावर (ओहळावर), इत्यादी शब्दरूपे मालवणी बोलीची लकब प्रकट करतात.

अनिल धाकू कांबळी यांनीही केवळ काव्यसंवाद रेखाटलेले दिसतात. एव्हाना या कवितेत ते मुलगा शहरात असूनही कोणतीच मदत न करणाऱ्या म्हाताऱ्याची करुण कहाणी मोजक्याच शब्दांत रेखाटतात. बायकोच्या आजारपणामुळे म्हातारा जीवनाला वैतागून दारू पिऊन तिठ्यावर पडलेला आणि आजारपणामुळे घरात अंतिम घटका मोजणारी म्हातारी विव्हळते -

*इकळापत असेल : मध्यान् रात झाली अजून घरात दिवो नाय लागलो*
*गो ऽ ऽ कोनीतरी माजा ह्या बोंदार बदला गो ऽ ऽ*
*कोनीतरी दोन घास मुकात घाला,*
*लय भूक लागली हां...*
*भागपुरुस गेलो खंय*
*माका लवकर मरान जावूक सांगतां...*

कांबळी यांच्या या कवितेत इकळापत - अवदसा, दिवो - दिवा, जावक - जावला, बोंदार जुनेर (पातळ) अशी बालीरूपे वैशिष्ट्यपूर्ण आहेत. महेश केळुसकर यांचा 'झिनझिनाट', दादा मडकईकर याचा 'चान्याची फुला' आणि नामदेव गवळी यांच्या असंग्रहित कविता यातून मालवणी बोलीचे तिच्या आंतरिक सौंदर्यासह लयतालाचे रूप समोर येते.

अशाच बोलीतील लयतालाचे प्रत्यंतर महेश केळुसकरांच्या 'झिनझिनाट' या कवितासंग्रहातल्या कवितांतून प्रत्ययाला येते. मालवणी लोकगीतांना आधुनिक संदर्भात अभिव्यक्त करण्याचेही प्रयत्न केळुसकर यांनी या संग्रहात केलेले दिसतात. '*आबोलेचो वळेसार ताळयेर गो ऽ ऽ, मालग्या घोऽव बलयता माळयेर गो ऽ ऽ*', ही कविता तसेच '*पांदणीत भेटलस, आंगाक खेटलस, काळोक किनाट, झालो झिनझिनाट*' या रोमँटिक आशयाच्या कवितेत मालवणी बोलीचा लहेजा चांगला उतरलेला दिसतो.

शेतकरी पतिपत्नीच्या काव्यमय संवादातून केळुसकरांनी इथल्या दरिद्री शेतकऱ्याचे दु:ख रेखाटले. त्याचबरोबर दु:खातही सुख मानण्याची वृत्ती ही अधोरेखित केली आहे.

*काय बगून घातलंय पाऱ्या, दारिद्र्याक माळ*
*बारव म्हयने खावची लागता सुकाट आणि डाळ*
*असा बोलान करू नकात कमी तेची गोडी*
*शंकर आनि पार्बतीची सोबता आमची जोडी (झिनझिनाट)*

बोलीची वैशिष्ट्यपूर्णता या कवितांमधून गोचर होते.

आधुनिक जीवनजाणिवा, संवेदना नामदेव गवळी यांनी बोलीतून प्रखरपणे व्यक्त केल्या आहेत. प्रादेशिक बोलीचा समर्थ आविष्कार नामदेव गवळींच्या कवितेत झालेला दिसतो. तळकोकणातील लोकरीती, श्रद्धा, परंपरा, येथील कृषिजीवन, शेतकऱ्यांचे लोकविधी, दारिद्र्याचे भोग भोगणाऱ्या स्त्रियांचे हलाखीचे जीवन, नवथर तारुण्यातील अव्यक्त प्रेम, गवळी यांच्या कवितेच्या केंद्रस्थानी असलेले दिसते. भोवतालच्या साठमारीच्या वास्तवात साधे सरळ जीवन जगताना आपली कशी असह्य घुसमट होत गेली, शिक्षणक्षेत्रात विनाअनुदान संस्कृतीने आपला बळी घेतला, त्यामुळे करावा लागलेला संघर्ष गवळी यांच्या कवितेत बोलीरूपातूनच समर्थपणे आला आहे. ते 'रस्ते तुडैत जाताना' या कवितेत लिहितात-

*थंडयेन कुडकुडलो भर जत्रेत पटार हरलो विडयेक म्हाग चायची पन पत नाय*
*पदयेन ञ्यात तोडला आपल्यासून, कपाळांर चौकचार संवसारबिवसार चाकरी करापली*
*झिरो ब्जेट, तेतुर लाखाचे रेट, पावला पावलाक सपनांची रकारका जाली*
*दादगान जाम कमायला सोऱ्या मटक्यार बंगलो, गाडी पंचायतीची पदा घरात यीली*
*आमची पेजेवयली नेटसेटगिरी शेपाड्चात मास्तरकीची अब्रू घेवन गेली*

याशिवाय व्हनीबाय, भावनी या कवितांतून आलेल्या ग्रामीण स्त्रियांच्या चित्रणातून त्यांच्या वेदना अधोरेखित होतात. 'भावनी' या कवितेत देवाच्या सेवेसाठी सोडलेल्या देवदासी(देवळी) समाजातील स्त्रियांची व्यथा बोलीतूनही ते उत्कटतेने मांडतात.

*सवासनीचो टिळो लावन विधवेचा जिणा जगतो*

*दारार सावली पडली काय सवैन पान फुडे करता*

येथे जगण्याचा कोंडमारा झाल्याची देवदासींची वेदना बोलीतून व्यक्त झाली आहे.

'चान्याची फुला' हा दादा मडकईकर यांचा कवितासंग्रह मालवणी बोलीचे वैशिष्ट्यपूर्ण असे रूप सिद्ध करणारा आहे. आपल्या सोनारकीच्या व्यवसायातील प्रतिमा, इथल्या कृषिजीवनाचे संदर्भ बोलीतून त्यांनी प्रकट केले आहेत. पिठूर चांदण्याच्या अनुभवाचे संवेदन व्यक्त करताना ते लिहितात-

*खोल खोल दरीत गो ऽ चान्याची फुलाऽऽऽ*

*किंवा बैल घेवून बापूस गेलो नांगर घेवून भाऽवूस*

*पावूस इलो पाऽवूसऽ पावूस इलो पाऽवूस*

कथा-कादंबरी या कथनात्मक साहित्यप्रकारात बोलीचे उपयोजन करणे अधिक प्रमाणात शक्य असते. हे साहित्यप्रकार दैनंदिन जीवनव्यवहारांचे थेट चित्रण करणारे, वास्तवदर्शी साहित्यप्रकार असतात. बोली ह्या सुद्धा प्रत्यक्ष दैनंदिन जीवनव्यवहाराचे एक अभिन्न अंग असल्यामुळे कथात्म साहित्यप्रकारांत बोलीचा वापर ग्रामीण जीवनानुभवांना अधिक समृद्ध आणि सचेतन बनविणारा ठरू शकतो. मालवणी बोलीचा विचार करता श्री०ना०पेंडसे, गो०नी० दांडेकर, मधु मंगेश कर्णिक, हमीद दलवाई, आ०ना० पेडणेकर, चिं०त्र्यं० खानोलकर, जयवंत दळवी, प्र०श्री० नेरूरकर हे लेखक ही बोली काही प्रमाणात साहित्यात वापरताना दिसतात. चिं०त्र्यं० खानोलकरांनी आपल्या 'कोंडुरा', 'रात्र काळी घागर काळी' या कादंबऱ्यांतून संवादासाठी बोलीचा वापर केलेला दिसतो. 'कोंडुरा' कादंबरीत तुरळक संवाद आढळतात. स्वत:ला देवी समजणारी सुताराच्या आवाठातील स्त्री म्हणते -

''मियां? सुताराच्या आवाठातली. मियां कोणाची कोण, कोण जाणा! मियां फकस्त देवी! माजी गावकऱ्यांनी पूजा बांदुक व्हयी. गावात पापा लय झालीहत...

माजा नाव भावकाय देवी. भावकाय देवीचा देऊळ पडलांहा तां बांदुक व्हयां. माजी पूजा बांदुक व्हयी.''

किंवा गावात देवदर्शनाला आलेला एक भक्त म्हणतो -

''झक मारलंव आनि इलंव. हुयसरलो कारबारच अडाणचोट हा!'' (कोंडुरा, पृ०२३)

असेच संवाद खानोलकरांनी कमीअधिक प्रमाणात आपल्या अन्य कादंबऱ्यामधून उपयोजिलेले दिसतात. पेंडसे, गो०नी० दांडेकर यांनीही केवळ संवादासाठीच बोलीचा

वापर केलेला दिसतो. मात्र त्यांच्या कादंबऱ्यातील ब्राह्मण व अन्य समाज यांच्या स्तरभेदाप्रमाणे हे संवाद बदलताना दिसतात. 'पडघवली' कादंबरीत ब्राह्मणाच्या घरात घुसलेले मुसलमान एकमेकांशी संवाद साधताना म्हणतात -

''म्हंमद, हंयशी बग, या फरतालात काय ठेवलाय बामनानी!''

''फत्या झंव तूं तिकरे काय करतोयस? बामनाची बिब्बी खंय गेली?'' किंवा ''आयजीच्या जीवार बायजी उदार होनार! आमच्या तोंडातला आंबा कारून.''

''मग एवढी वर्षे नाही खाल्लंत तुम्ही.''

असे अपवादात्मक संवाद येथे दिसतात. म्हणी आणि वाक्प्रचारांचाही वापर त्यांनी निवेदनासाठी केलेला दिसतो. 'इंधन' या कादंबरीत हमीद दलवाई यांनी सुद्धा संवादासाठी बोलीचा वापर केलेला दिसतो. या कादंबरीतील नायक मुंबईतून गावी येतो तेव्हा वाटेत त्याला गावातील एक बैलगाडीवाला ओळखतो. त्या वेळचा संवाद हा रत्नागिरीमधली बोलीचा उत्कृष्ट नमुना :

''तू आयलोस ही खरांच वाटत नाय गावात कललां तर लोक चकीत होतील-''

''त्यात चकीत काय होयाचा? त्यांना माझी याद बी नसेल.''

''वा! ऐसां कुठ झयलाय? ते तुझा फोटो बगतत''

भाबी पीठ मळत मध्येच म्हणाली, ''आत्ताची पोंरां छापो वाचयला लागलीत. गावात धा छापे येतात'' ''इकत घेवन वाचतात?''

''हो, पयल्यासारखे चिपलुनात जावन वाचत नाय.''

भाऊ उद्गारला, ''तुझी खबर छाप्यात अयली की लोक जादा इकत घेतात, बाबाना आनुन दाखवतात'' (इंधन पृ० ८)

वरील संवादात वर्तमानपत्रासाठी 'छापे' हा शब्द काही काळापूर्वी वापरला जात असे असे दिसते. 'इंधन' कादंबरीत दलवाई यांनी गावातील विविध जातींमधील बोली उच्चाराची विविधता सूक्ष्मपणे टिपली आहे. भाषेप्रमाणे बोलीतही कालांतराने परिवर्तन होत जाते. जसजसे सिंधुदुर्ग मालवणपासून उत्तरेकडे रत्नागिरीच्या प्रदेशात जाऊ, तसतसा या बोलीच्या उच्चारात काहीसा फरत पडत जातो. विशेषत: ळ वर्णाचे ल वर्णात रूपांतर होणे हे परिवर्तन येथे दिसते. याचे अतिशय स्पष्ट असे रूप इंधनमधील संवादातून आले आहे.

जयवंत दळवी यांनी 'महानंदा', 'सारे प्रवासी घडीचे' या ललित लेखनात संवादासाठीच बोलीचा वापर केलेला दिसतो. मधु मंगेश कर्णिक यांनी 'भाकरी आणि फूल' या कादंबरीत आणि अनेक कथांमधून संवादासाठी बोलीचे उपयोजन केलेले दिसते. 'माझा गाव माझा मुलुख' या कोकणातील गावांचा परिचय करून देणाऱ्या पुस्तकात तर त्यांनी ही ग्रामीण बोली प्रत्येक गावात कसकशी बदलत गेली आहे याचे वास्तवपूर्ण

लेखन केले आहे.

वरील सर्व लेखकांपेक्षा प्रवीण बांदेकर यांनी मालवणी बोलीचा वापर चपखलपणे केला आहे. आपल्या 'चाळेगत' या बहुचर्चित कादंबरीमध्ये त्यांनी बोलीभाषेचे प्रयोग केलेले दिसतात. कादंबरीतील बरेचसे निवेदन त्यांनी मालवणी बोलीतून केलेले दिसते. म्हणी, वाक्प्रचार, लोकगीते यांच्या वापरातून बोलीची विविध रूपे, त्यातील लयतालासकट व्यक्त केली आहेत. 'चाळेगत' कादंबरीत प्रारंभी भेटणाऱ्या संकासूर या पात्राच्या तोंडची भाषा मालवणी भाषेचा उत्कृष्ट नमुना आहे. दशावतार नाटकातील संकासूर ब्रह्मदेवाकडून वेद पळवून देतो, ह्या पूर्वरंगातील प्रसंगामध्ये सूत्रधार आणि संकासूराचे संवाद मार्मिक आहेत. बांदेकरांनी आधुनिक जाणिवांसाठी या मिथकाचा मार्मिक वापर केला आहे. संकासूर सूत्रधाराला म्हणतो -

''माका त्येच्या इद्येशी काय् च देनाघेना नाय ह्या तुमचा बरोबर, भटजींनु! पन माका याक सांगा, ह्यो तुमचो देवाधिदेव, सगळ्या दुनयेचो पोषणकर्तो म्हंतास ना; त्येका तरी आमची अठरापगड जातीची हत्यारां काडून घेवंचा काय कारण होता? खंयूच्या अधिकरान् आमच्या हत्यारांका हात लायल्यान् त्येंना, अवो या आमच्या हत्यारांवरच तर आमचा प्वॉट, तुमका म्हाईतच आसा! आता कोण आपल्या प्वॉटाआड येव्क लागलो तर आपन तरी काय करायचां, तुमची सांगा. माजी खंडीभर प्वॉरा आनि पायलीभर बायल्यो उपाशी मराक लागली आस्ताना मी गप बसांचा काय? ह्या असा खंयच्या शास्त्रात सांगतिलासा?...आनि आमची हत्यारा ही दुनयेसाठी कवडी मोलाची आसतीत; पन आमच्यासाठी ती आमची पोटां आसत्. पन ह्या तुमच्या इद्वशी इद्वानांनीं काय केल्यानी? आमच्या अठरापगड जातींच्या हत्यारांचो सत्यानाश केल्यांनी. त्येंच्यानी माज्या कुळवाड्याचो नांगर मोडल्यानी. माज्या गावातल्या कुंभाराचा चाक मोडल्यांनी, चांबाराची आरी न्हेल्यानी... सुताराची रोकन गेली; कोष्ट्याचो माग आणि गाबत्याची जाळी सांडली!'' ('चाळेगत' पृ० २९) जागतिकीकरणाने उद्ध्वस्त झालेल्या ग्रामीण संस्कृतीचे प्रतीकात्मक चित्रण वरील संवादातून लेखकाने रेखाटलेले दिसते.

याचबरोबर बांदेकर यांनी कोळी बांधवांची मालवणी बोली व अनुषंगाने गोमंतकीय कोकणीचेही उपयोजन केलेले दिसते. कादंबरीतील दामू तांडेल आपल्या छोट्या होडीतून मासेमारी करायला जातो तेव्हा त्याची जाळी ट्रॉलरमधून मासेमारी करणारे तोडून टाकतात तेव्हा संतापलेला दामू त्यांना शिव्यांची लाखोली वाहतो. ट्रॉलरवर असलेली दांडगट पोरेही त्याला शिव्या देतात. त्यांचा हा संवादसुद्धा संघर्षपूर्ण झालेला दिसतो.

''कितें रे, च्येडयेच्या, आरडाक कित्यें झालें पिशे लागलें काय कितें रें?
आवय् मेऽऽली, काय बापूय् पिड्ढ्यार जालों रे ऽऽ ब्बाँब मारतास ती?
चल्लंस काय कितें रें ऽऽ पोटार् हात घेवून?

आव्वय् ऽऽ ज्वणच्याच्याऽऽ ऱ्हाव तुकां देकयतां किर्ते तें सारकें...''

येथे गोमंकातील कोंकणी आणि त्यातूनच आलेली कोळ्यांची मिश्रभाषा उत्कटतेने आली आहे. बांदेकर यांनी 'चाळेगत' कादंबरीत मालवणी म्हणींचाही मोठ्या प्रमाणात वापर केला आहे.

उदा० पानयेलीच्या धर्मानं शेवग्याक पानी (पृ० २७)

गजालीन खाल्लो घोव आनी फुरश्यन खाल्ली बायल (पृ० २८)

अशा कितीतरी म्हणी बोलीचे रूप उलगडून दाखवतात. बोलीभाषेत पात्रांची नावेही वैशिष्ट्यपूर्ण असतात. 'चाळेगत'मध्ये दामू, नारबा, गजा, संत्या, मंग्या अशी नावे खास बोलीची लकब दाखवणारी आहेत. 'चाळेगत' ही बोलीचे प्रयोग केलेली महत्त्वाची कादंबरी ठरते. कारण या पूर्वीच्या कोकणची पार्श्वभूमी असलेल्या कादंबरीत इतके प्रभावी आणि विविधांगी उपयोजन झालेले दिसत नाही.

कादंबरीकडून नाट्यवाङ्मयाकडे वळताना असे म्हणावेसे वाटते की, गंगाराम गवाणकरांनी नाटकासाठी ही बोली चपखलपणे वापरली. 'वस्त्रहरण', 'पांडगो इलो रे बा इलो' इत्यादी नाटकांनी मराठी रंगभूमीवर बोलीतील नाटकांकडे पाहण्याची दृष्टी बदलविली असे म्हणता येईल. 'वस्त्रहरण' हे नाटक याबाबत प्रारंभ आणि उत्कर्षबिंदू मानावे लागते. या नाटकातील सूत्रधार आणि अन्य सारीच पात्रे मालवणी बोलीचे विविध विभ्रम व्यक्त करतात. द्रौपदी वस्त्रहरणाच्या प्रसंगावर गावकऱ्यांनी सादर करण्यास घेतलेला नाट्यप्रयोग, त्यात आलेल्या असंख्य अडचणी आणि त्या अडचणींवर मात करीत, प्रसंगी प्रेक्षकांनाही नाटकात सामील करून घेत नाटकाचा खेळ पूर्णत्वाकडे नेण्याचा प्रयत्न म्हणजे हे नाटक. हे नाटक प्रयोगाचे सगळे रीतिनिष्ठ संकेत मोडतानाच मालवणी भाषेचे सर्वांगाने उपयोजन करणारे ठरले आहे. या नाटकातील संवाद आणि तात्या या सूत्रधाराची नाटकाचे संचालन करतानाची मालवणी बोली सतत हास्याचे कारंजे उडवत राहते. गावपातळीवर नाटकाला स्त्रीपात्र मिळणे कठीण त्यामुळे गावातीलच एका पुरुषाला स्त्रीपार्टीचे काम दिले जाते; पण त्याची बायको बाळंत होते. संगीतकार वाद्यांसह कुणाच्या तरी मर्तिकयात्रेला जातात. अशा क्लृप्त्या नाटकात योजल्यामुळे हे नाटक बोलीभाषेचा वापर फॅन्टसीसाठी करते. सूत्रधार नटीविषयी सांगताना म्हणतो -

''तात्या : तुमका नटीचा काय म्हायत आसा, नटी म्हणजे सुळावरची पोळी. मुंबयसून हाडूची तर त्योचो आवस बापूस येतलो. आसलोच तर घोवय येतलो. ''

असे फुटकळ विनोद या नाटकात अनेक घडतात. मात्र त्यातून द्व्यर्थी वाक्यरचना केली जाते. नाटकाला उशीर का झाला याचे कारण सांगताना तात्या म्हणतो - ''एक नाजूकशी अडचण आसा, आमच्या द्रोपदीची बायको बाळत झाली. म्हणजे द्रोपदीचा काम

करणाऱ्याची बायको बाळत झाली.'' नाटकभर असे संवाद द्व्यर्थी रचनेमुळे रसिकांना विनोदाचा प्रत्यय देतात. 'पांडगो इलो रे बा इलो', 'वडाची साल पिंपळाक' या नाटकांची संवादभाषा मालवणी बोलीच असलेली दिसते.

जयंत पवार यांनी आपल्या 'अधांतर' या नाटकात गावातून मुंबई शहराकडे गेलेल्या मालवणी माणसांची बोली वापरलेली आहे; जी किंचितशी बदललेल्या उच्चार वैशिष्ट्यांनी युक्त असलेली बोली आहे. विशेषत: या नाटकातील आईच्या तोंडची भाषा ही बोलीचेच रूप प्रकट करते. उदा० ''संध्याकाळी पावसकरीण येयल ब्लाऊज झाला काय म्हणून इचारायला. भंडारीण हाय ती. एकदा तोंड सोडलान् की इचारायला नको.'' अशा उपयोजनातून माणसांचे मूळ प्रदेश अधोरेखित होतात असे म्हणता येईल. सावंतवाडीतील लेखिका उषा परब यांनी 'सोरगत' ही एकांकिका मालवणी बोलीत लिहिली आहे.

येथपर्यंत आपण मालवणी बोलीच्या मराठी साहित्यातील उपयोजनाचा काहीसा धावता आढावा घेतला. वरील सर्व विवेचनातून असे म्हणता येते की, मालवणीचे निखळ स्वरूपातील उपयोजन काही अपवादात्मक कलाकृतीतून आले आहे. अनेक साहित्यिक केवळ संवादासाठीच या बोलीचा वापर करताना दिसतात. मात्र हे संवाद कृत्रिम असलेले दिसत नाहीत. लेखकांनी आपल्या जीवनदृष्टीचा भाग म्हणून बोलीचे हे उपयोजन केले आहे. त्यांची बोलीच्या उपयोजनामागील आस्था आणि समज सहज प्रत्ययाला येते. हे या उपयोजनाचे खरे यश म्हणावे लागते. कारण एकाच प्रदेशातील जात आणि समाज-गटांप्रमाणे बोलीमध्ये असलेली भिन्नताही या उपयोजनातून प्रकट झाली आहे. मालवणी बोलीच्या बाबतीत कोळी, मुस्लिमसमाज, कुळवाडी (शेतकरी) सारस्वत आणि महारी इ० समाजाची बोली आपापले किंचितसे वेगळेपण राखताना दिसते. बोलीतूनही कोणताही जीवनानुभव समर्थपणे अभिव्यक्त करता येतो, याची साक्षही या उपयोजनातून पटते.

हे सर्व खरे असले तरी आजही बोलीचे उपयोजन मोठ्या प्रमाणात होताना दिसत नाही. किंवा बोलीतून स्वतंत्र साहित्यनिर्मिती होण्याचे प्रमाण अत्यल्प असलेले दिसते. याचे मुख्य कारण म्हणजे आजही बोलीकडे पाहण्याची समाजाची दृष्टी निवळलेली नाही. व्यापक समाज केवळ पाठ्यपुस्तकातील भाषेला महत्त्वाची, शुद्ध, प्रतिष्ठित आणि एकमेव मानत आहे. हे भाषिक नियामकतेचे बंध तोडल्याशिवाय बोलीला ऊर्जितावस्था प्राप्त होणे कठीण आहे. आज बोलीकडे पाहण्याचा दृष्टिकोन बदलतो आहे. पाठ्यपुस्तके आणि विद्यापीठीय अभ्यासक्रम यातून बोलीकडे पाहण्याची दृष्टी अधिक व्यापक बनल्यास संस्कृतीवर होत असलेले जागतिकीकरणासारखे आक्रमण थोपविण्यास भूमिनिष्ठ अशी बलशाली प्रमाणके प्राप्त करता येतील. कारण आजमितीला कितीतरी समाजगटांचे आणि त्यांच्या भूमिनिष्ठ संस्कृतीचे वास्तव जगासमोर यायचे शिल्लकच आहे. अख्ख्या मानवसंस्कृतीचा तळ ढवळून काढण्याची शक्ती बोलीठायी निर्माण करता आली तर

त्यातून त्या त्या परिक्षेत्रातील लेखक कवींना बहुजनवादी, संस्कृतिनिष्ठ परंपरा प्राप्त
आणि ज्ञानेश्वरांनंतर पुन्हा 'बोली अरूपाचे रूप दावीन' अशी सामर्थ्यशील ज
मनाशी जपता येईल, असे म्हणावेसे वाटते.

## चित्रकार परिचय

■ **खेतमर,** प्रदीप : 'भाषा आणि जीवन' वर्ष ३०च्या चारही अंकांची मुखपृ
प्रदीप खेतमरांची होती.

टपाल-पत्ता : 'आर्ट ॲडव्हरटायझिंग', 35, श्रीराम, दुसरा मजला, ओ
गुरुदत्त सोसायटी, सर्व्हे क्रमांक 11 , नवग्रह मारुती मंदिराजवळ, चव्हाणनग
धनकवडी, पुणे 411 043.
स्थिरभाष : (020) 2437 9435 चलभाष : 095523 40167
ई-पत्ता : pradeep.khetmar@gmail.com

# भारतीय भाषांचे 'लोकसर्वेक्षण'

अरुण ज

मानवाला आवाजाची देणगी मिळाली. भाषेची नाही; पण मानवाने भाषा हे स्वतः
निर्माण केलेले एक दैवी योगदान आहे. त्यातून भाषासंस्कृती - भाषासंस्था नि
झाल्या. ह्या भाषासंस्थांचा किंवा भाषासंस्कृतीचा अभ्यास टाळून जगाचा इति
अभ्यासता येणार नाही.

भाषिक सर्वेक्षणाचा स्तुत्य उपक्रम 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण - महाराष्ट्र
खंडाद्वारे साकार होत आहे. महाराष्ट्रात पंथ, जाती, धर्म, संप्रदाय यांची विविधता 
यामुळे मराठी भाषेची प्रादेशिक रूपे साहजिकच अनेक आहेत. अभिजन, बहुजन, 
विमुक्त, आदिवासी, दलित अशा विविध समाजांच्या विविध भाषिक रूपांनी मह
ध्वनित होत असतो. हा भाषिक सर्वेक्षणाचा ग्रंथ आहे. हे सर्वेक्षण आजचे - 
आजचे आहे. मूळ भाषिक व इतर परंपरा आणि तिच्यात वेळोवेळी होत असलेले
व त्यातून संक्रमित झालेली आजच्या पिढीची बोली किंवा तिची रूपे येथे आढळ
स्वातंत्र्योत्तर काळात लोकांनी स्वयंप्रेरणेने केलेले हे पहिलेच भाषा सर्वेक्षण होत 

**पार्श्वभूमी**

भाषांचे सर्वेक्षण आज भारतातील सर्व राज्यात अंतिम टप्प्यात आले आहे. 
वर्षांपूर्वी म्हणजे ८, ९, १० मार्च २०१०ला बडोदा (वडोदरा) येथे एक भाषा प
झाली. 'भाषा केंद्र बडोदा'ने आयोजित केलेल्या ह्या कार्यक्रमास ३२० भाषांचे ७०
आसपास प्रतिनिधी सहभागी झाले होते. तीन दिवस चाललेल्या ह्या 'भाषा संगम
चर्चासत्रांतून काही निर्णायक निष्कर्ष काढण्यात आले.

त्यापैकी एक महत्त्वाचा होता - भाषिक सर्वेक्षणाचा. आणि हे सर्वेक्षण लो
स्वयंप्रेरणेने शासनाच्या मदतीशिवाय करावे. ह्या भाषासंगम कार्यक्रमास मा० नाराय
देसाई, ज्येष्ठ साहित्यिक व सामाजिक कार्यकर्त्या महाश्वेतादेवी यांच्यासह अनेक ना
सामाजिक कार्यकर्ते, भाषावैज्ञानिक, प्रकाशक, संपादक उपस्थित होते.

एक विशाल स्वप्न पाहणे आणि त्यांचा पाठपुरावा करून प्रत्यक्ष अस्तित्वात अ
हे डॉ० गणेश देवींचे वैशिष्ट्य आहे. 'भाषावन आणि भाषासर्वेक्षण' हे त्यांनी त्या
पाहिलेले एक स्वप्न होते. त्यास समाजातील सर्व घटकांची मान्यता घेऊन ते क
झाले.





अनुक्रमणिका

'भाषा संगम'च्या भव्य संमेलनाचा व सर्व चर्चासत्रांचा त्या वेळी मी फक्त साक्षीदार होतो. त्या वेळी मला माहीत नव्हते की पुढे मी एका महाप्रकल्पाला जोडला जाणार आहे, नव्हे त्यात माझी किंचितशी भूमिकाही असणार आहे !

त्यानंतर वेळोवेळी भाषावैज्ञानिकांची अनेक चर्चासत्रे झाली. मैसूर, कोलकता, हैदराबाद, अहमदाबाद, बडोदा, दिल्ली, पुणे अशा अनेक भागांतून, शहरांतून मान्यवर अनुभवी भाषावैज्ञानिक ह्या चर्चासत्रांत सहभागी झाले. त्यांतून भाषांच्या सर्वेक्षणाचा आराखडा व स्वरूप तयार केले गेले. भाषेची माहिती संकलित करताना कोणत्या गोष्टी समाविष्ट कराव्यात हे ठरले. त्यानुसार प्रत्येक राज्यात हे काम सुरू झाले. ही प्रक्रिया सहज-सुलभ नव्हती. प्रत्येक राज्यात असे प्रकल्प संपादक, प्रकल्प समन्वयक तयार करणे आवश्यक होते. डॉ० गणेश देवी यांच्या सामाजिक कार्याची पार्श्वभूमी, त्यांचे भाषाविषयक यापूर्वीचे काम, इंग्रजी ग्रंथलेखक म्हणून त्यांना असलेली मान्यता, यांमुळे त्यांच्याविषयी भारतभरच एक आदरभाव आहे. त्यामुळे डॉ० गणेश देवींना संपूर्ण भारतात असे 'नेटवर्क' तयार करता आले. भाषांचे ऱ्हासपर्व चालू असताना डॉ० देवींचे त्या भाषांच्या सर्वेक्षणाचे एक 'ध्यासपर्व'च सुरू झाले. ह्या प्रकल्पपूर्ततेसाठी आज संपूर्ण भारतात जवळजवळ ८०० भाषांचे प्रतिनिधी कार्यरत आहेत.

**प्रकल्पाचे स्वरूप**

भाषावैज्ञानिकांना अभिप्रेत असलेली सर्वरूढ पद्धत थोडी बाजूला ठेवून एकविसाव्या शतकाच्या सुरुवातीच्या काळात भारतीय भाषांची स्थिती काय आहे, याचा स्पष्ट नकाशा आखण्याच्या हेतूने जाणीवपूर्वक अनैतिहासिक पद्धत पीएलएसआरने स्वीकारली आहे. ही गोष्ट सर्वेक्षणाच्या सर्व खंडाला असलेल्या प्रस्तावनेत डॉ० देवी यांनी स्पष्ट नमूद केली आहे. डॉ० देवी यांच्या प्रस्तावनेत ह्या सर्वेक्षणाविषयीच्या अनेक गोष्टींची चर्चा आहे. त्यातून सर्वेक्षणाविषयी डॉ. देवी आणि त्यांच्या सहकार्यांनी केलेल्या कामाची दिशा अभ्यासकांना समजू शकेल.

महाराष्ट्राच्या भाषिक सर्वेक्षणाविषयी सांगायचे झाल्यास, अस्तित्वात असलेल्या भाषा, उपभाषा, बोली यांचा शोध घेणे वरकरणी सोपे वाटत असले तरी क्षेत्रीय काम हे एक आव्हानच होते. सापुतरा आणि पुणे येथे झालेल्या दोन चर्चासत्रांनंतर महाराष्ट्रातील सर्वेक्षणाचा एक आराखडा तयार झाला. पुणे येथील एका वर्कशॉपमधून मला कामाचे स्वरूप, दिशा आणि अडचणी यांची काहीशी कल्पना आली; परंतु हे चर्चासत्र अधिक महत्त्वाचे ठरले. त्यातून पुढे महाराष्ट्राच्या भाषांच्या अभ्यासास प्रारंभ झाला. महाराष्ट्रातील भाषांच्या सर्वेक्षणाच्या ह्या प्रकल्पाची संपादक/समन्वयक म्हणून माझी निवड झाली. त्या वेळी काही भाषांचे प्रतिनिधी उपस्थिती होते. महाराष्ट्रातील भाषांव्यतिरिक्त ह्या खंडात महाराष्ट्रात सध्या अस्तित्वात असलेल्या भाषांशिवाय उर्दू आणि सिंधीचाही ह्यात

समावेश करण्याचे ठरले. कारण ह्या भाषांना स्वतंत्र राज्य नाही.

मराठी आणि मराठीची रूपे - (येथे बोलीऐवजी रूपे हा शब्द जाणीवपूर्वक वापरला आहे.) आदिवासींच्या भाषा, भटक्या-विमुक्तांच्या भाषा आणि सर्वेक्षणात ह्याशिवाय प्राप्त झालेल्या काही इतर भाषा. उदा० दख्खनी (मिरजजवळ बोलली जाणारी भाषा), नॉलिंग (कोकणातील एका गावात बोलली जाणारी भाषा) इ० अशा भाषांचा शोध घेतला आहे. त्यातून एकूण बावन्न भाषांचा हा भाषिक (आणि सामाजिक व सांस्कृतिकही) दस्तऐवज तयार झाला आहे.

**क्षेत्रीय कार्य आणि सर्वेक्षण प्रक्रिया**

लोकसमूहात जाऊन एखादी माहिती उपलब्ध करून घेणे; विशेषतः ग्रामीण, अशिक्षित लोकांकडून काही माहिती प्राप्त करून घेणे हे आव्हानात्मक काम असते. अशा वेळी लोकांच्या मनात आपल्याविषयी विश्वास प्राप्त करून घेणे महत्त्वाचे असते. लोकांना प्रकल्पाचे महत्त्व समजावून सांगणे, त्यांनी दिलेल्या माहितीमुळे त्यांचे व त्यांच्या भाषेचे, जीवनपद्धतीचे महत्त्व जगाला कसे समजणार आहे, ह्या राष्ट्रीय प्रकल्पात आपला हा सहभाग किती महत्त्वाचा आहे, हे पटवून देणे; हे एक कौशल्याचे व जिकीरीचे काम असते. हे कौशल्य केवळ लोकांसाठी किंवा लोकसमूहांसाठीच नव्हे, तर अनेक वेळा ह्यातील सहभागी लेखकांसाठीही पणाला लावावे लागते. प्राप्त माहिती उचित वेळेत पाठविणे, माहितीतील दुरुस्ती किंवा त्रुटी कळविल्यास ती माहिती पुन्हा अद्ययावत करून पाठविणे, यात अनेक वेळा त्यांची उदासीनता दिसून आली. अनेक वेळा त्यांच्या इतर कामांमुळे ते शक्य झाले नाही किंवा ती माहिती संकलित करण्यात त्यांचे क्षेत्रीय कार्य कमी पडले असावे, आता अशा गोष्टींना अडचणी म्हणता येणार नाहीत. शोधप्रक्रियेचे हे सर्व घटकच असतात. प्रारंभी महाराष्ट्रात थोड्याच भाषा असाव्यात असे वाटले; परंतु ही शोधप्रक्रिया जशी वाढत गेली, तसतशी ही संख्या वाढतच गेली. भटक्या-विमुक्तांच्या भाषांविषयी लेखन करणारे बहुतेक त्या समाजातील कार्यकर्तेच आहेत. त्यांचा जनसंपर्क असतो; पण लिहिण्याची सवय आणि शिस्त त्यांना अवगत नसते. अशा वेळी त्यांच्याबरोबर राहून काम करावे लागते. दोन वर्षे ही सर्वेक्षण प्रक्रिया लांबली, ती अशा अडथळ्यांमुळे; पण त्यातून मानवी मनाची विविध रूपे पुन्हा अभ्यासता आली.

महाराष्ट्राच्या ह्या खंडात मराठीची विस्तृत माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे. शेवटी एक गोष्ट लक्षात घ्यायला हवी, ती म्हणजे हे भाषांचे सर्वेक्षण आहे; भाषेचा किंवा भाषाविज्ञानाचा अभ्यास नाही. त्यामुळे ही सर्वेक्षण प्रक्रिया फार तर भाषेचा इतिहास आणि वैशिष्ट्ये सांगणारी आहे; वाङ्मयाचा इतिहास अथवा अभ्यास सांगणारी नाही.

क्षेत्रीय काम करताना अथवा भाषांची माहिती मिळविताना आलेली मुख्य अडचण म्हणजे नव्या पिढीला आपल्या समाजाची भाषा फारशी माहीत नसते. किंवा आपण

आपल्या भाषेतून बोललो, भाषेविषयी बोललो, तर आपली जात इतरांना समजेल असे त्यांना वाटते. समाजाच्या मुख्य प्रवाहात येण्यासाठी बहुतांश भटक्या-विमुक्तांच्या नव्या पिढीने मराठी भाषा घरात आणि घराबाहेर स्वीकारली आहे. सामाजिक अभिसरणाच्या प्रक्रियेत ही गोष्ट अभिनंदनीय आहे; मात्र त्या समाजात त्या त्यांच्या भाषा बोलणाऱ्यांची संख्या विरळ का होईना पण आहे. समाजातील सर्व भाषांवर प्रमाण मराठीचे मोठे आक्रमण झालेले आहे. हे ह्या सर्वेक्षण प्रक्रियेत स्पष्ट झाले.

**सर्वेक्षणाचे महत्त्व**

मि० ग्रिअर्सन यांनी ब्रिटिश काळात केलेल्या भाषा सर्वेक्षणाला आता शंभर वर्षे झाली आहेत. ग्रिअर्सन ह्यांनी घेतलेले परिश्रम, त्यांची दृष्टी, त्यांच्या कार्याचे मोल हे सर्व वंदनीय आहे; परंतु ब्रिटिशकालीन झालेल्या ह्या सर्वेक्षणाचा हेतू भारतीय भाषांच्या दृष्टीने किती शुद्ध होता हे तपासायला हवे. आजचे हे सर्वेक्षण लोकांनी, लोकांच्या प्रेरणेतून केलेले आहे म्हणून त्यास 'पिपल्स लिंग्विस्टिक सर्व्हे ऑफ इंडिया' किंवा मराठीत 'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण' असे म्हटले आहे. आपल्या सामाजिक, सांस्कृतिक आणि भाषाविषयक विविधतेचा अस्तित्वाचा आणि किंचित प्रसंगी अस्मितेचाही हा आविष्कार आहे. त्याहीपेक्षा महत्त्वाचे म्हणजे हा अभ्यास समाजशास्त्र व मानववंशशास्त्र यांच्या अभ्यासकांना अतिशय उपयुक्त ठरणारा आहे.

भाषांची आजची स्थिती व त्यांचे अस्तित्व दर्शविणारे हे सर्वेक्षण दीर्घकाळानंतर झालेले आहे. समकालीन भाषांची नोंद ह्या निमित्ताने अधोरेखित होत आहे. कमी होत जाणाऱ्या किंवा मरणाऱ्या भाषांना ह्यातून फार बळ मिळेल असे म्हणता येणार नाही; परंतु त्यांचे दस्तऐवजीकरण ह्या निमित्ताने झाले आहे. भाषिक विविधतेचा अभ्यास, भाषांचे संचयन, संवर्धन आणि दस्तऐवजीकरण करणे ह्या भाषाविषयक महत्त्वाच्या कामात ह्या सर्वेक्षणाचे योगदान अभूतपूर्व ठरणार आहे. संकटग्रस्त आणि स्थानिक भूमिपुत्रांच्या भाषांचा ह्यातून गौरव होत आहे, हे फार महत्त्वाचे वाटते.

**सर्वेक्षणाच्या मर्यादा**

सर्वेक्षणात महाराष्ट्रातील भाषांची माहिती संकलित करण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न केला आहे; परंतु काही भाषा बोलणारी कुटुंबे स्थलांतरित झाली आहेत. जी एक-दोन राहिली, तीही मराठीच बोलतात. उदा० सिद्दी. तर काही भाषांमध्ये मराठी शब्द सहज रूढ आहेत. विशेषतः महिन्यांची, वारांची नावे, अंतरे-कि.मी., वजने, इ० आपल्या दैनंदिन जीवनात मराठी किंवा इंग्रजी कॅलेंडर वापरण्याच्या सवयीतून हे झाले आहे. ह्या गोष्टींना पूर्वी त्या त्या भाषेत प्रतिशब्द होते. काही भाषांमध्ये ठरलेल्या निकषानुसार संपूर्ण माहिती मिळवणेही आव्हानात्मक ठरले. त्यामुळे सर्व भाषांची माहिती एकसारखी न येता कमी-जास्त प्रमाणात आली आहे. आमच्यासाठी अज्ञात ठरलेल्या काही भाषा

कोणी लक्षात आणून दिल्या तर पुढील आवृत्तीत त्यांचा समावेश करता येईल.

नगरी, कोल्हापुरी, सातारी, वैदर्भी, अशा बोलींचा स्वतंत्र बोली म्हणून येथे समावेश हेतुपूर्वक केलेला नाही. ह्या भाषा भौगोलिक क्षेत्र स्पष्ट करणाऱ्या आहेत व त्यामध्ये फरक फक्त 'हेल'चा आहे. मराठीपेक्षा त्याचे स्वरूप फार वेगळे नाही. यावर काही मतभेद होऊ शकतात; पण प्रकल्पाची रचना करताना सहभागी लेखक-संपादक व भाषा तज्ज्ञांशी व मुख्य म्हणजे डॉ० देवींशी याबाबत चर्चा करूनच हा निर्णय घेतला आहे. खरं तर ह्याला मर्यादा म्हणता येणार नाही. पण यासंबंधी थोडे स्पष्टीकरण द्यावे या हेतूने हे नमूद केले आहे.

**समारोप**

'भारतीय भाषांचे लोकसर्वेक्षण : महाराष्ट्र' हा प्रकल्प मराठीतून आता ३० नोव्हेंबरला मा० राज्यपालांच्या हस्ते राजभवन, मुंबई येथे प्रकाशित होत आहे. ह्यानंतर ह्या खंडाच्या इंग्रजी अनुवादाचे काम सुरू होईल. भारतीय भाषांच्या सर्व राज्यांतील खंडांतून आणखी काही खंड तयार होतील, त्यात सांकेतिक/चिन्हांची भाषा(साइन लॅंग्वेज)च्या स्वतंत्र खंडाचाही समावेश होणार आहे. अनुसूचित जाती, जमाती, भटके, विमुक्त, अभिजन, बहुजनांच्या ह्या सर्व भारतीय भाषांचे नेटके व सत्य प्रदर्शन ह्या इंग्रजी खंडांमुळे संपूर्ण जगाला होणार आहे. भारतातील भाषिक व सांस्कृतिक विविधतेने जगभरातील अनेकांना चकित करून सोडले आहे. ह्या निमित्ताने भारताचा एक 'भाषिक फोटोग्राफ' जगासमोर येत आहे.

ह्या राष्ट्रीय प्रकल्पात मला सहभागी होता आले, ह्या निमित्ताने अनेक सहभागी लेखकांबरोबर व समाजघटकांबरोबर काम करता आले. डॉ० गणेश देवी, डॉ० सुरेखा देवी व भाषा केंद्र बडोदाचा स्टाफ ह्यांनी केलेल्या मार्गदर्शनामुळे, सहभागी लेखकांच्या सहकार्यामुळे हा प्रकल्प पूर्ण झाला. त्यांचे ऋण मानताना मला माझ्या आत्मविकासाचे एक सूत्र सापडले. भाषेच्या अभ्यासाचे माझे छोटेसे क्षेत्र अधिक विस्तारले, ही माझ्या व्यक्तिगत जीवनातली मोठी जमेची गोष्ट आहे.

नियोजित ग्रंथाच्या प्रारंभी संत ज्ञानेश्वरांची ओवी दिली आहे, ती येथे उद्धृत करून लेख संपवतो.

*जैसे बिंब तरी बचके एवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें ।*
*शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ॥* (श्रीज्ञानेश्वरी - ४.२१३)



# पायाशुद्ध मराठी

नारायण गोविंद कालेलकर

एकच भाषा बोलणाऱ्या लोकांच्या समूहाला भाषाशास्त्रात 'समाज' हे नाव आहे. लोकांचे आपापसातले दळणवळण शक्य व सोपे करणारे भाषा हे एक पहिल्या प्रतीचे साधन आहे. त्यामुळे भाषा ही एक सामाजिक संस्था आहे असे म्हटले जाते.

पण कुठल्याही समाजात, सर्व प्रदेशात अगर सर्व लोकांच्या तोंडी पूर्णपणे सारखी अशी भाषा नसते. व्यक्तीचा धंदा, सामाजिक दर्जा, जात, राहण्याचा प्रदेश या गोष्टी तिच्या भाषेचे स्वरूप नक्की करतात. सामान्यतः अशी समजूत असते की, भाषा एक असून तिच्या प्रादेशिक व इतर भेदांना पोटभाषा म्हणतात; पण ही समजूत चुकीची आहे. खरोखर अशा अर्थाने भाषा अस्तित्वात नसते. अस्तित्व असते ते ठिकठिकाणच्या बोलींना. **या बोलींतली जी बोली प्रमाणभूत मानली जाते, जिच्यात ग्रंथरचना होते, आणि जिला लेखनासाठी इतर बोली बोलणारे लोक आदर्श मानतात तिला प्रमाणभाषा हे नाव दिले जाते.** लेखनात वापरली जाणारी ही बोली पुढे पुढे ग्रंथरचनेसाठी आणि त्यासारख्या इतर कार्यासाठी इतकी रूढ होते, तिचे पुस्तकी स्वरूप इतके चिवट व पक्के बनते की, बोलली जाणारी भाषा एकसारखी बदलत राहण्याच्या निसर्गनियमामुळे आपल्यापासून किती दुरावली आहे, तसेच व्याकरण, शब्दसंपत्ती, उच्चार, इत्यादी दृष्टींनी तिच्यात किती फरक पडला आहे, याचे भान लेखकांना राहत नाही. लेखी भाषा व तोंडी बोली यातले अंतर वाढू न देणे, आणि निदान ललित लेखन व जिव्हाळ्याच्या प्रश्नांवर होणारी लेखी चर्चा ही लिहिता-वाचता येणाऱ्या सामान्य माणसाच्या आटोक्यात ठेवणे, हे आजच्या लेखकांचे पहिले कर्तव्य आहे. हे कर्तव्य पुष्कळशा लेखकांकडून पार पाडले जात नाही आणि लेखी मराठीचे स्वरूप दिवसेंदिवस अधिक दुर्बोध व हास्यास्पद बनत चालले आहे, यामुळेच या विषयाची चर्चा करण्याची पाळी आली आहे.

लेखक पंडित व वाचक रसिक मानणारे युग मागे पडले आहे आणि लोकशाहीचा कोंबडा आरवल्यालाही बराच काळ लोटला आहे. लोकांना भाषा शिकवण्याचे दिवस संपले आहेत, आता लोकांची भाषा शिकण्याचे दिवस आले आहेत. परिणामकारक भाषेला अलंकारांची गरज नसते, तर जिवंतपणाची असते. हा जिवंतपणा ज्या भाषेत आढळतो तीच पायाशुद्ध भाषा होय.

पायाशुद्ध हा शब्दप्रयोग करण्याचे खास कारण हे की, भाषेच्या बाबतीत आपल्या शुद्धाशुद्धतेच्या कल्पना विचित्र आहेत. 'शुद्ध कसे बोलावे आणि शुद्ध कसे लिहावे, तसेच हे शुद्ध का किंवा अशुद्ध का हे व्याकरण शिकल्याने समजते'; अशी व्याकरणाची महती दादोबा पांडुरंगांनी सांगितली आहे. आपली भाषा शिकण्याचा प्रयत्न करणाऱ्या परभाषिक विद्यार्थ्यांपुरते हे विधान अंशतः खरे आहे. पण व्याकरणाची व्याख्या करायची झाली तर मी म्हणेन की, लोकांच्या बोलण्याचा नीट अभ्यास करून भाषा कशी बोलली जाते याविषयी जे नियम शोधून काढण्यात येतात त्यांनी होणारे मार्गदर्शन म्हणजेच व्याकरण, आणि ही बोली ज्या लेखनात वापरली जाते ते त्या काळचे साहित्य. अशा रीतीने व्यवहारांतली भाषा व्याकरणकर्त्यांना आणि साहित्यिकांना मार्गदर्शक ठरली पाहिजे; तरच ते व्याकरण शुद्ध आणि ते साहित्य प्रभावी ठरेल.

भाषेकडे पाहण्याची दृष्टी अशा रीतीने बदलताच शुद्ध व अशुद्ध यासंबंधीच्या आपल्या कल्पनादेखील पार बदलतील. वस्तुतः पूर्वापार चालत आलेली जी भाषा आईच्या तोंडून अथवा आजूबाजूच्या व्यक्तींच्या बोलण्याचे अनुकरण करून आपण जन्मापासून शिकतो ती अशुद्ध कशी असेल? अशुद्ध भाषा म्हणजे एका ठरावीक समूहाच्या बोलण्याचे नियम न पाळणारी भाषा. आणि या तत्त्वाप्रमाणे साधारणपणे एखादा परकी माणूसच आपल्या मूळ भाषेशिवाय इतर कोणतीही भाषा बोलताना चूक करू शकेल. स्वभाषेच्या लेखनात मात्र पुष्कळदा चूक होण्याचा संभव असतो; कारण भाषा जशी बोलली जाते तशी ती क्वचितच लिहिली जाते. ऱ्हस्व-दीर्घच्या अथवा अनुस्वाराच्या चुका अतिशय सुशिक्षित व्यक्तींच्या हातूनही होतात.

म्हणून 'रानी', 'पानी', 'व्हता', 'सोला', इत्यादी शब्द वापरणाऱ्या पोटभाषा बोलणारे लोक अशुद्ध बोलतात, त्यांना शुद्ध मराठी येत नाही, असे जेव्हा शिष्ट भाषा बोलणारे लोक म्हणतात, त्या वेळी आपले समाजाच्या आणि भाषेच्या इतिहासाचे अज्ञान ते दाखवत असतात. 'व्हता' हा गावंढळ वाटणारा शब्द 'न' मागे लागून 'नव्हता' असा होताच शुद्ध बामणिया बनतो. 'राज्ञी', 'पानीयम्', 'षोडश' ही रूपे हिंदीच्या भाषाक्षेत्रात 'रानी', 'पानी', 'सोला' होऊन त्यांना राष्ट्रभाषेत स्थान मिळते, तर भाषेच्या त्याच नियमांनी मराठी प्रदेशात ती तशाच मार्गाने बदलूनही अशुद्ध व चुकीची ठरतात. पुष्कळांची तर समजूत अशी आहे की, 'ण' व 'ळ' बोलता न येणारे लोक 'न' व 'ल' हे ध्वनी वापरतात. खरी गोष्ट ही की, मराठीच्या काही पोटभाषात 'ण' व 'ळ' हे ध्वनी नाहीत. प्रत्येक पोटभाषेत सारखेच ध्वनी असले पाहिजेत असा थोडाच नियम आहे? गुजरातीच्या काही पोटभाषात संस्कृत 'ल'चा 'र' होतो (कमल-कमर), 'स'चा 'ह' होतो (सासू-हाहू). त्या ठिकाणीही शिष्ट समजली जाणारी भाषा बोलणारे लोक हे अशुद्ध प्रयोग आहेत असे समजतात. भाषेचा अभ्यास केल्याशिवाय अशा विचारातील

अशास्त्रीयता लक्षात येणार नाही. जन्मल्यापासून एका ठरावीक काळापर्यंत प्रत्येक मूल आजूबाजूच्या भाषेतल्या ध्वनींचे अनुकरण करण्याची कसरत करत असते. ही ध्वनींची संख्या निश्चित असते. हे सर्व ध्वनी नीट उच्चारता येऊ लागताच भाषेच्या ध्वनिविषयक अडचणींतून मूल बाहेर पडले असे समजावे. पुढे अनुकरणाने व्याकरण आणि शब्दसंग्रह यांचे ज्ञान मुलाला होते. अशा रीतीने मुळात येत असलेल्या ध्वनींची संख्या व स्वरूप मर्यादित असल्यामुळे पुढे जेव्हा मुलाला शिक्षणासाठी किंवा इतर कारणांनी परभाषेतले नवीन (म्हणजे स्वत:च्या भाषेत नसलेले) ध्वनी शिकण्याचा प्रसंग येतो तेव्हा हे नवीन ध्वनी स्वभाषेतल्या त्यांच्याशी साम्य असणाऱ्या ध्वनींप्रमाणे त्याच्याकडून उच्चारले जातात. इंग्रजीतील 'f'चा उच्चार आपण 'फ' असा करतो, 'th' याचा उच्चार 'थ' किंवा 'ध' करतो आणि आपल्याला इंग्रजीचे ध्वनी स्पष्ट व बिनचूक उच्चारता येतात, या अभिमानात चूर असतो. एवढेच काय, पण इंग्रजांनाच स्वत:ची भाषा नीट बोलता येत नाही, असे म्हणणारे अनेक लोक माझ्या पाहण्यात आहेत. म्हणजे आपली मराठी ही इतर बोलींहून शुद्ध, एवढेच नव्हे तर आपले परभाषेचे उच्चारसुद्धा ती भाषा बोलणाऱ्यांहून अधिक प्रमाण! जातींच्या उच्चनीचत्वाची वर्गवारी आपण भाषांच्या बाबतीतही लागू केली आहे, हे आपल्या सामाजिक जीवनाच्या रूढ सिद्धांतांना धरूनच आहे.

शालेय शिक्षणातील साहित्यात जे जीवन दाखवले जाते ते खऱ्या जीवनापासून किती दूर असते! रामभाऊंकडे श्रीखंडपुरी केली होती किंवा शामभटजींनी एका बैठकीत बुंदीचे पन्नास लाडू फस्त केले, असे वाचायला मिळेल; पण रामजी पाटलाकडे झिंग्याचा रस्सा केला होता किंवा म्हादबा मोऱ्याकडे मुर्गीपुलावाचा बेत होता किंवा पापलेट स्वस्त झाल्यामुळे अमुक लोक खुषीत होते, असे जर कोणी लिहिले तर त्याला पाठ्यपुस्तकात जागा मिळणे पूर्ण अशक्य आहे. एवढेच काय, पण भाषेप्रमाणे कोण काय खातो यावरही आपल्या समाजात माणसाचा शुद्धाशुद्धपणा अवलंबून राहतो. अशा रीतीने ज्या भाषेला बहुजन समाजाच्या जीवनाची तोंडओळखसुद्धा नाही, ती भाषा शब्दसंपत्ती किंवा जीवनाचे संपूर्ण व यथातथ्य दर्शन या अर्थाने, पायाशुद्ध म्हणता येणार नाही. बोलीला जवळची आणि जीवनाचे प्रतिबिंब दाखवणारी भाषा किंवा पोटभाषा हीच शिक्षणाच्या प्रारंभी माध्यम म्हणून वापरली गेली पाहिजे, आणि ज्या शिक्षणसंस्थांत समाजाच्या सर्व थरांतील मुले येतात तेथे उच्चनीचत्वाची, शुद्धाशुद्धतेची अपमानकारक व खुळचट कल्पना जाऊन समाजाच्या बहुविध जीवनाचे दर्शन घडवणारी भाषा आली पाहिजे. तरच भाषेचे शिक्षण पायाशुद्ध आहे असे म्हणता येईल. आपल्याकडच्या क्रमिक पुस्तकात हा पायाशुद्धपणा नाही किंवा असल्यास तो कमी कमी होत चालला आहे.

[ 'भाषा आणि संस्कृती' : मौज प्रकाशन, मुंबई, १९६२,
(पृ० ५५-५९)मधील संपादित भाग ] ■



अनुक्रमणिका

# माझी कुत्तरओढ

संजयकुमार कोळी

सोलापुरातील सातत्याने वापरली जाणारी भाषा ही पुणे-सातारा-सांगली-कोल्हापूर यांच्यापेक्षा काहीशी निराळी आहे; असा माझा अनुभव आहे. त्याची ही काही उदाहरणे आहेत :

(१) उदा० **'वट्ट'** हा शब्द उच्चारल्यानंतर त्याचे वजन, प्रस्थ, दरारा त्यांच्यामागील भाव असे इतर पर्यायी अर्थाचे प्रमाण मराठीतील शब्द सूचवूनही त्याची परिपूर्ण अभिव्यक्ती होत नाही.

उदा० **'तो काल शाळेत वट्ट आलाच नाही'** यातील आलाच नाही, नाहीच आला, न येण्याविषयी तो फारच आग्रही होता, हा अर्थ ध्वनित होतो.

उदा० **'तो वट्टात फिरतो'** यातील भाव व तो ऐटीत, तोऱ्यात, टेचात, दिमाखात हे सर्व त्यांचे अर्थ आहेत. पण वट्टात फिरण्यात त्यांच्या शब्दात जी जगण्याला पूर्णपणे कवेत घेण्याची ताकद आहे, ती खरोखर शब्दातीत असते.

(२) याशिवाय 'वाढुळशान (कवाधरनं, कवासनी, कवापासनं) मी तुमची वाट बघतोयं' इथे खूप वेळापासून, केव्हापासून, मी तुमची प्रतीक्षा करतो आहे. यातील वाढुळशान हा अस्सल बोलीतील शब्द आहे. तो आजही सोलापुरातील अनेक भागात तसेच ग्रामीण बोलीत सर्रास वापरला जातो. खरं म्हणजे 'लीळाचरित्रा'त 'वाढवेळु झाला' हा शब्द 'उशीर झाला' या अर्थाने वापरला गेला. महानुभाव साहित्याच्या निर्मितीच्या आधी हा शब्द भाषेत रूढ असावा, तो आजच्या बोली भाषेत 'वाट बघण्यासाठी' म्हणजेच वाढुळशान या अर्थाने वापरला जाऊ लागला असावा.

(३) 'कवाधरनं बघतोय तू आपलं सारखं बोलतचं राहिला. आता गप्प होईल तवा गप्प राहिलं, पण कसलं काय? ह्याचं आपलं सुरूच आहे. आरं **'तुझ्या तोंडाला (जिभेला) काही आडपट्टा आहे की नाही'**. इथे जिभेला आडपट्टा हा शब्द बहुधा घोड्याच्या तोंडात एक लोखंडी किंवा बीडची पट्टी, ४ ते ६ इंची सळईचा तुकडा की जो चामड्याच्या साहाय्याने बांधलेला असतो, तो अर्थ कदाचित अभिप्रेत आहे. खरं तर वाह्यात, काळ-वेळ-प्रसंगाचा विचार न करता काहीही बोलणाऱ्या व्यक्तीला उद्देशून आपण वरील शब्द वापरतो.

**कवा, तवा** हे शब्द केव्हा, तेव्हा या प्रमाण भाषेतील बोलीचे रूप आहे. तसेच

अह्यतॉव, गेलतॉव, करतॉव, बसतॉव, बोलतॉव, जातॉव, ह्यासारखे बोलीतील शब्द सर्रासपणे सोलापूर जिल्ह्यातील अनेक ग्रामीण भागात वापरले जाते. जसे त्यामध्ये एक प्रकारची सहजता असते. तसेच त्यात जिव्हाळा, आपलेपणा व्यक्त होताना दिसतो. याशिवाय म्हटलॉव, सांगितलॉव, केलॉव अशाप्रकारची 'ऑव' प्रत्यय लावून क्रियापदे तयार करतात.

प्रत्येक व्यक्तीला अथवा व्यक्तिसमूहाला त्यांच्या म्हणून काही भाषिक-सामाजिक-सांस्कृतिक अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य असले पाहिजे. आजच्या सामाजिक-शैक्षणिक-सांस्कृतिक जीवनामध्ये त्याच्यावर काही मूल्यात्मक बंधने आलेली आहेत. त्याचा परिणाम म्हणून त्या-त्या व्यक्तीच्या अथवा समूहाच्या नैसर्गिक व्यक्त होण्यात काहीसा पोकळपणा आल्याचे दिसून येते. कारण आज मी कोणत्याही व्यक्तीला ज्या सहजपणे माझ्या ग्रामीण बोलीभाषेत 'जा माझं उपडून भारे बांध' म्हणालो असतो. तसे न म्हणता सुशिक्षित व सुसंस्कृत असल्याच्या दिखाऊपणामुळे मी पर्यायी शब्द म्हणून 'तुला काय करायचे ते कर' असे शामळूपणे बोलून जातो. अर्थात ही माझी अभिव्यक्ती उपरी असते. मला माझ्या भाषेत अभिव्यक्त होता येत नाही. इथे माझ्या मनात अभिव्यक्तीच्या संदर्भात द्वंद्व निर्माण होते.

त्यामुळेच प्रत्येक व्यक्तीला आपापल्या भाषिक-सामाजिक-प्रादेशिक-सांस्कृतिक अभिव्यक्तीचे स्वातंत्र्य असले पाहिजे. जर ती नसेल तर ती व्यक्ती पूर्णपणे व्यक्त होईलच अथवा होतेच असे म्हणता येणार नाही. यातील ग्रामीण जीवनातील सर्वपरिचित अभिप्रेत असलेला अर्थ ज्या जोरकसपणे भाव व्यक्त करू शकतो, तसा तो पांढरपेशी जीवन-जाणिवेतून व्यक्त करू शकत नाही. शेवटी हे सर्व संदर्भ पेठीय व शहरी नेणिवेच्याही पलिकडचे आहेत.

माझ्या अस्सल जगण्याचे इथल्या भाषिक-सांस्कृतिक-शैक्षणिक-अभिव्यक्तीच्या दडपणाखाली झालेले नैसर्गिक दमन येथे व्यक्त करावयाचे आहे. इथल्या इतिहासाने, भाषेने-सांस्कृतीने माझ्या अभिव्यक्तीवर सातत्याने बळजबरी केली आहे. त्यामुळे माझे मूळ व्यक्त होणे मी विसरून गेलो आहे. त्यामुळे मी जेव्हा माझ्या गावी जातो, तिथे मी उपरा ठरलो आहे. माझे मित्र माझ्याकडे एक बिघडलेल्या अर्थानेच पाहात असतात. ही सर्व माझी कुत्तरओढ मला पाहवत नाही.

■

# कोयाबोली

विजया चौधरी

[ परीक्षित पुस्तक : कोयाबोली, लेखक तिरू. सीताराम मंडाले, प्रकाशक तिरू सीताराम मंडाले, पृष्ठसंख्या १२०, मूल्य ₹ ७०/-]

तिरू. सीताराम मंडाले यांनी कोयाबोली या नावाने गोंडी भाषेतील शब्दसंग्रह तयार करून पुस्तकरूपाने प्रसिद्ध केला आहे. सुरुवातीला शब्द, स्वर, व्यंजने, स्वरचिन्हे, बाराखडी, जोडाक्षरे यांच्या व्याख्या स्पष्ट करून मुखयंत्रातील उच्चारस्थानानुसार अक्षरांची (कंठस्थान, तालुस्थान, मूर्धास्थान इ०) वर्गवारी केली आहे. त्यानंतर गोंडी वर्णमाला, मात्रा, विरामचिन्हे, बाराखडी, अंक यांची माहिती देऊन नियमित वापरातील शब्दसंग्रह दिला आहे. गोंडी वाक्यरचना, सणवार, आदिवासी क्रांतिकारकांची नावे इत्यादी माहितीची त्यात भर घातली आहे. गोंडी शब्द, त्याला मराठी व हिंदी प्रतिशब्द असे याचे स्वरूप आहे.

कोयाबोली ही गोंडवनातील गोंडी गणांमध्ये संवादाचे माध्यम असलेली भाषा आहे जिला गोंडी भाषा म्हणतात. आदिवासी गोंडांच्या हजारो वर्षांच्या सांस्कृतिक प्रवासातून ही भाषा अभिव्यक्तिक्षम बनलेली आहे व गोंडी लोकांची आजही प्रमुख भाषा आहे. महाराष्ट्रातील नांदेड जिल्हा तसेच नागपूर, अमरावती, आंध्रप्रदेशातील अदिलाबाद, मध्यप्रदेशातील बस्तर, मंडला या जिल्ह्यातही ही भाषा बोलली जाते. ('गोंडवन' या शब्दाचा उगम, त्याचे प्राचीनत्व व विभागनिश्चिती यासाठी 'भाषा आणि जीवन' वर्ष २९, अंक २, पृ० ७४ वरील एल०के० कुलकर्णी यांचा 'प्रतिसाद' पाहावा.) या भाषेवर हिंदी-तेलुगु भाषेचा प्रभाव आहे व गोंड लोकांनी ती मौखिक माध्यमातून जतन करून ठेवलेली आहे. गोंडी लिपीत मुद्रणाची सोय नसल्यामुळे यातील हस्तलिखिते मुद्रित करताना देवनागरी लिपीचा वापर केलेला आढळतो. भाषेसंबंधीची ही सर्व माहिती या पुस्तकातून उपलब्ध होते.

सीताराम मंडाले यांनी २००९ साली हे पुस्तक प्रथम प्रकाशित केले. त्या पुस्तकात गोंडी लिपीचा परिचय, मुद्रणाची सोय नसल्यामुळे. हाताने लिहिलेल्या अक्षरांमधून करून दिलेला होता. ते पुस्तक पाहताना गोंडी लिपीतून मुद्रण न करण्यामागची अडचण स्क्रिप्ट रिसर्च इन्स्टिट्यूटचे प्रा० मुकुंद गोखले यांच्या ध्यानात आली. त्यांनी 'कोयाबोली' या पुस्तकातील माहितीच्या आधारे गोंडी लिपीचा अभ्यास केला. त्यांना या लिपीतील

अक्षरांचा संबंध इतर लिप्यांशी दिसून आला नाही; परंतु काही अक्षरांची रचना मोहेंजोदडो हडप्पा येथील चिन्हांशी मिळतीजुळती आहे असे आढळून आले. (संदर्भ : लोकसत्ता-लोकरंग पुरवणी, १३ मार्च २०११मधील त्यांचाच लेख). (या लिपीच्या प्राचीनत्वाचा हा एक पुरावाच म्हणावा लागेल). अक्षरांचा बारकाईने अभ्यास करून त्यांनी एक टंक(फॉन्ट) तयार केला. सुलभ संगणकीय जुळणीसाठी संकेतप्रणाली तयार केली व त्यानुसार कळफलक तयार करून भविष्यात गोंडी लिपीला युनिकोडमध्येही स्थान मिळावे यासाठी आखणी केली. अशाप्रकारे संगणकावर गोंडी लिपीच्या मुद्रणाची सोय उपलब्ध करून दिली. त्यानंतर श्री० मंडाले यांनी गोंडी लिपीतील अक्षरे, प्रा० गोखले यांनी उपलब्ध करून दिलेल्या टंकाच्या साहाय्याने मुद्रित करून या पुस्तकाचे २०११ साली पुन:प्रकाशन केले. गोंडी लिपीतील मुद्रणजुळणीचा हा जगातील पहिलाच प्रयत्न असावा असा त्यांचा दावा आहे.

या भाषेतील उपलब्ध हस्तलिखित साहित्याबद्दलची माहिती लेखकाने प्रस्तावनेत दिली असती तर मुद्रणाच्या करून दिलेल्या सोयीमुळे झालेल्या फायद्याचे महत्त्व अधिक ठसले असते. तसेच वापरात असलेला शब्दसंग्रह जरी दिला असला, तरी त्यावरून भाषेतील शब्दसंख्येचा एकूण आवाका किती आहे, ते लक्षात येत नाही. अशा काही त्रुटी जाणवत असल्या तरी या लेखाचा उद्देश त्रुटींकडे निर्देश करणे हा नसून एखाद्या बोलीच्या लिपीचा टंक, संगणकावर उपलब्ध करण्याचा जो उल्लेखनीय प्रयोग केला आहे त्याकडे लक्ष वेधणे हा आहे.

आधुनिक काळात, लेखन-मुद्रण करण्यासाठी संगणकाची मदत अपरिहार्य आहे. त्या दृष्टीने प्रा० गोखले यांच्या कामाचे महत्त्व वादातीत आहे. ही भाषा बोलणाऱ्यांची संख्या लाखोंच्या घरात आहे, असे म्हटले जाते. परंतु मुद्रणाची सोय नसल्यामुळे या भाषेच्या लिखित वापरावर मर्यादा येत होत्या. ही त्रुटी आता टंकामुळे दूर झालेली आहे. आदिवासी गोंड समाजाची नवी पिढी या भाषेपासून बरीच दूर गेलेली आहे याची लेखकाला जाणीव आहे. परंतु आधुनिक काळात आदिवासी गोंड समाजात शिक्षणाचे प्रमाण वाढलेले आहे. अशा नवशिक्षित समाजापुढे, या टंकामुळे, उपलब्ध हस्तलिखितांचे मुद्रण करणे, आदिवासी गोंडांना मातृभाषेतून शिक्षण उपलब्ध व्हावे यासाठी सरकार दरबारी पाठपुरावा करणे, या भाषेतून पाठ्यपुस्तके तयार करणे अशी नवी आव्हाने पेलण्यासाठी संधी उपलब्ध झालेली आहे. अशा प्रयत्नांनी नव्या गोंड पिढीला पुन्हा मातृभाषेकडे वळवणे शक्य होईल आणि एक प्राचीन बोली होणाऱ्या ऱ्हासापासून वाचू शकेल अशी शक्यता मुद्रणाच्या या सोयीमुळे निर्माण झाली आहे. देवनागरीहून वेगळी लिपी असलेल्या बोलींसाठी हा एक अनुकरणीय असा उपक्रम आहे.

■

# बदलत्या जगाच्या आदिवासी कविता

मृणालिनी शहा

[ परीक्षित पुस्तक : 'निवडुंगाला आलेली फुलं' प्रभू राजगडकर, प्रनील प्रकाशन, चंद्रपूर, २०१२, पृष्ठे १७१, मूल्य ₹ १५०/-]

१९६० नंतर मराठी साहित्यात अनेक नवनवीन प्रवाह निर्माण झाले. त्यातील आदिवासी साहित्याचा प्रवाह सामाजिकतेच्या आणि साहित्याच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे. या आदिवासी कवितेचा विचार करताना भुजंग मेश्राम, वाहरु सोनवणे, उषाकिरण आत्राम या पहिल्या पिढींच्या कवींमध्ये प्रभू तानबाजी राजगडकर यांचेही नाव आवर्जून घेण्यासारखे आहे. राजगडकर यांच्या 'निवडुंगाला आलेली फुलं' (२०१२) ह्या काव्यसंग्रहांचे शीर्षकही सार्थ आहे. हा कवी १९७०-८० पासून कविता करीत असला तरी 'येथून पुढे' हा त्यांचा काव्यसंग्रह २००६मध्ये प्रसिद्ध झाला आहे. 'अलीकडच्या काही कविता' (२००७) आणि 'गोगलू' (२००८) हे दोन काव्यसंग्रह घडीपुस्तिका म्हणून त्यांनी प्रकाशित केले आहेत.

या संग्रहातील कविता सामाजिक तत्त्वज्ञानाचा, मानवी अस्तित्वाचा वेध घेतात. एवढेच नाही तर सांस्कृतिक पातळीवरच्या जाणिवांचा स्वाभाविक मागोवा घेण्याचा प्रयत्न करतात. या संग्रहात विविध विषयांवरील कविता आहेत. त्यातील 'गोगलू' आणि 'मल्टी ॲटिट्यूड टॉवर्डस् आदिवासी' या कवितांमध्ये मानवी संवेदनेतून आदिवासींच्या अस्तित्वाला माणूसपणाचा नवा आयाम देण्याचा प्रयत्न कवीने केला आहे. आदिवासींचे प्रश्न त्यांच्या सामाजिकतेत आहेत; तसेच ते अर्थव्यवहाराच्या प्रक्रियेतही आहेत. आदिवासी लोकांना त्यांच्या निर्वाहप्रधान अर्थव्यवस्थेत अडकवून ठेवणे म्हणजे त्यांच्यावर अन्याय करण्यासारखेच आहे. अशी कवीची ठाम भूमिका आहे. ह्यामुळेच 'मल्टी ॲटिट्यूड टॉवर्डस् आदिवासी' या कवितेमध्ये कवी म्हणतो -

आदिवासी म्हणजे :  
अभ्यासकाला  
सापडलेला मजेदार विषय  
मिशनऱ्यांसाठी  
धर्माच्या कपड्यात लपटलेला,  
स्वयंसेवींना



अनुक्रमणिका

हवा असलेला
'शुद्ध' करण्यासाठीची वस्तू,
नक्षल्यांना
लढण्यासाठी मिळालेलं
हत्यार.

आदिवासींविषयीचे हे आपले दृष्टिकोन प्रथम आपण बदलायला हवेत, असे तीव्रतेने कवी मांडतो, तेव्हा त्याच्याशी आपण सहमत होऊ शकतो.

'गोगलू' या कवितेत गोगलू नावाच्या आदिवासी पोराचे व्यक्तिचित्रण आहे असे वरवर वाटत असले तरी त्यात आजच्या घडीला एकाच देशात राहणाऱ्या दोन समाजजीवनातल्या टोकाच्या स्थितीचे चित्रण आहे. शिवाय या दोन स्थितीतील ताण यांचे वास्तव चित्रण आहे. त्यामुळे त्यात सामाजिक, राजकीय आणि सांस्कृतिक अशा तीन पातळ्यांवरच्या आंतर-संघर्षाचे चित्रण स्वाभाविकपणे व्यक्त झाले आहे. 'पोलिओमुक्त भारत' या मोहिमेच्या एका जाहिरातीने सुरू झालेली कविता पुढे वाचकांनाही अंतर्मुख करत जाते. शासनाच्या मानवी कल्याण विभागाचे लोक गडचिरोली या आदिवासींच्या लोकवस्तीच्या ठिकाणी येतात. माहीतगार म्हणून गोगलूला जिप्सीत घेतात. त्या वेळी गोगलू त्यांना जे प्रश्न विचारतो, ते फारच बोलके आहेत.

पण, मले सांगा साहेब -
एक गोष्ट मी बोलू;
साऱ्या देशालेच तं झाला आहे
भलता भयान पोलू!
त्याले कोणता डोस;
बंदुकीचा । मतपेटीचा
का, कोणता?

या त्याच्या प्रश्नाने, हा पोरगा निरागस असला तरी त्याच्या सभोवतालच्या वास्तवाने त्याच्या मनावर ओरखडे ओढलेले आहेत, असे वाचकांच्या ध्यानात येते. शेवटी हा गोगलू "डम डम डमरू का केजना
चाँद लगे माथे का रो कित्तारे दादा
शिवाना दरसन कितोरे"
असे गाणे म्हणतो तेव्हा रसिकाला जगाच्या बदलाविषयीचे भान येतेच येते.

अशा या आदिवासींचे जीवन साक्षात करणाऱ्या कवितांच्या बरोबरीने यातील दीर्घ कविता देखील उल्लेखनीय आहेत. 'गांधी : एक - दोन, तीन, चार, पाच' अशा कविताही विचारार्ह आहेत. डॉ० बाबासाहेब आंबेडकर यांच्यावरील कविता कवीची

विचारसरणी कळण्यास उपयुक्त आहे. 'माझी कविता', या कवितेमध्ये केलेले आत्मचिंतन देखील महत्त्वाचे आहे. 'विठ्ठला' ही कविता देखील कवीचे भावविश्व उलगडून दाखवणारी आहे.

एकूणच या सर्व कवितांमध्ये भाषेची तीनचार रूपे दिसतात. काही ठिकाणी अस्सल आदिवासी भाषा येते, तर काही ठिकाणी प्रमाण मराठी येते. तर काही कवितांमध्ये इंग्रजी शब्दांचे प्राबल्यही दिसते. बदलणारे जीवन दाखवण्यासाठी त्यांनी तशी शैली निवडलीही असेल. प्रभू राजगडकर यांच्या या कवितांमध्ये व्यष्टी-समिष्टीच्या आंतरबंधांचे तीव्र भान दिसून येते. या कवितेचे अधिष्ठान म्हणजे मार्क्स-आंबेडकरांचे तत्त्वज्ञान आहे हेही सहज लक्षात येते. 'निवडुंगाला आलेली फुलं' हा काव्यसंग्रह अशाप्रकारे चिंतन आणि भावपरता या दोन्हींचा समतोल राखणारा आहे.

■

## 'कानाला खडा लावणे'

कृ० पां० कुलकर्णी ह्यांच्या मराठी व्युत्पत्ति कोशात 'कानाला खडा लावणे', अद्दल घडणें अशी नोंद असून त्यापुढे प्रश्नचिन्ह योजलेले आहे. (तृतीय आवृत्ती १९९३, पुनर्मुद्रण २००४, पान १७०). ह्याचा अर्थ त्या वाक्प्रचाराचे मूळ ज्ञात झालेले नाही असा होतो. ह्या संदर्भात डॉ० माणिक विठ्ठल चव्हाण ह्यांचा 'बंजारा समाजातील विवाहपद्धती' नावाचा एक लेख ('अनुबंध', मराठी साहित्य मंडळ, गुलबर्गा ह्यांचे त्रैमासिक, ऑक्टोबर-डिसेंबर २०११) अलीकडेच माझ्या वाचनात आला, त्यातील संबंधित माहिती पुढीलप्रमाणे आहे -

बंजारा समाजात लग्नविधीमध्ये अंघोळीला फार महत्त्व असते. अंघोळ झाल्यावर 'डोसक्या फोडणे' हा विधी होतो. नवरदेवाचा लहान मेहुणा मातीचा कुंडा वराच्या पायाजवळ नेतो व पुन्हा मागे घेतो. एकाच नेमात वराकडून पायाने कुंडा फोडला गेला तर त्याचा नेम चांगला आहे असे समजतात. त्याचबरोबर 'कानाला खडा लावण्याची' प्रथा आहे. कानाला खडा लावण्याच्या ह्या विधीमुळेच कानाला खडा लावणे म्हणजे अनुभवाने शहाणे होणे ही म्हण मराठीत आली असावी. कानाच्या पाळीला खडा जोरात दाबला जातो. हे काम वराचा मेहुणा करतो. कानाला खडा लावून मेहुणा विचारतो, ''माझ्या बहिणीला त्रास देशील? तिला कधी रागावशील?'' अशा वेळी वर ''नाही'' असे उत्तर देतो.

- विजय पाध्ये, पुणे



अनुक्रमणिका

# अवदंश

ह्या शब्दचर्चेला सुरुवात झाली तेव्हा माझ्या मुद्द्याला प्रतिसाद देताना तुम्ही खालील विधान केलं आहे –

संस्कृत भाषा ही समाजात बोलली जाणारी भाषा असताना ज्या संकल्पना समाजात रूढ होत्या त्यांच्याचसाठी संस्कृतमध्ये शब्द उपलब्ध असणे व इतरांसाठी नसणे ह्यात वावगे असे काहीच नाही. उलट त्या काळी प्रस्थापित नसलेल्या संकल्पनांसाठी (उदा० proprietor, shopkeeper, clerk अशा शब्दांना) संस्कृत प्रतिशब्द शोधणे चुकीचेच आहे, असे मला वाटते. तसे शोधले तर आपल्या हाती 'व्यस्त' (उफराटा, उलटासुलटा) शब्द लागणार हे निश्चित.

ह्या संदर्भात मला आपण पूर्वी संग्रहात नोंद करून ठेवलेला एक संस्कृत शब्द आत्ताच अवचित सापडला. तो शब्द आहे 'अवदंश'. ह्या शब्दाचा अर्थ आहे – मद्यपान करीत असताना बैठकीची रंगत वाढविण्यासाठी, भावना चेतवण्यासाठी दिलं किंवा घेतलं जाणारं आंबटतिखट चवीचं खाणं. आपट्यांच्या कोशात आणि मोनियर विल्यम्सच्या कोशातही stimulant food, pungent snacks असे अर्थ असल्याचं आढळतं. ह्यावरून असं अनुमान काढता येतं की अलीकडच्या काळातच दारूच्या पार्ट्यांमध्ये अधूनमधून तिखटमीठ फासलेले दाणे, काजू, चणेफुटाणे तोंडात टाकण्यासाठी ठेवले जातात असं नव्हे, तर ही पूर्वापार चालत आलेली सार्वत्रिक प्रथा आहे.

**- विजय पाध्ये**

भारतात दूरदर्शन सुरू झाल्यावर पहिल्या काही दशकांत सरकारी दूरदर्शनाने अनेक चांगले मराठी शब्द रूढ केले होते (अगदी माशीच्या व्यत्ययासकट). चांगले कार्यक्रम दिले. परंतु खासगी वाहिन्या, विशेषतः खासगी वृत्तवाहिन्या सुरू झाल्यावर त्यांनी जाणीवपूर्वकच नव्हे तर हेतूपूर्वक मराठीच्या जागी हिंदी-इंग्रजी शब्द रूढ करणे सुरू केले. पत्रकार-वार्ताहर, पत्रकार-परिषद, पंतप्रधान, फॉरीन अफेअर्स डिपार्टमेंट, डिफेन्स मिनिस्टर, श्रेष्ठी, असे अनेक रूढ व सर्वांना समजत असलेल्या मराठी शब्दांचे उच्चाटन करून जरनॅलिस्ट, प्रेस कॉन्फरन्स, प्रधानमंत्री / प्राईम मिनिस्टर, परराष्ट्र (व्यवहार)

खाते, संरक्षणमंत्री, हायकमाण्ड, असे पूर्वी अनेक (मराठी वर्तमानपत्रे वाचणाऱ्या सामान्यांनी) न ऐकलेले शब्द रूढ करण्याची अहमहमिका चालवली. हे सर्व जाणीवपूर्वकच नव्हे तर हेतूपूर्वकच नव्हते काय?

अनेकदा दूरचित्रवाणीवरील मराठी जाहिरातींमध्ये विनाकारण हिंदी धाटणीची भाषा वापरून आमच्या भाषेमध्ये उकंडा करून ठेवतात. 'साबण गळेल की टिकेल', 'जागा ग्राहक जागा', 'पाणी न मिळवलेले दूध', 'पैसे जोडा', 'सर्दीपासून सुटकारा' अशा प्रकारचे धेडगुजरी वाक्यप्रयोग ऐकून अंगावर काटा येतो.

अवदंश ह्या शब्दाचे संस्कृत शब्दकोशात खालील अर्थ सापडले.

अवदंश = any pungent food which excites thirst, stimulant.

दंश = pungency

'मद्यपानाच्या बैठकीत रंगत वाढवणारे, भावना चेतवणारे' असा अर्थ सापडला नाही. तसा अर्थ काढणाऱ्याने बहुधा thirst हा शब्द गाळून इंग्रजीतील उर्वरित अर्थाचे वाक्य वाचले असावे. विशेषत: which excites, stimulant हे शब्द वाचून त्याने पुढला निष्कर्ष (आजच्या परिस्थितीप्रमाणे किंवा त्याच्या स्वानुभवावरून) काढला असावा असे वाटते.

**- सलील कुळकर्णी**

पाध्ये यांनी 'अवदंश' या शब्दाचा दिलेला अर्थ त्यांना कोठे सापडला याची मला कल्पना नाही. तो बरोबर वाटत नाही.

या प्रकारच्या चर्चेमध्ये आपण कोणते कोश वा इतर सामग्री वापरतो आहोत याचा निर्देश झाला तर अधिक स्पष्टता येईल.

सलीलने आपटे (१९६५) यांचा संस्कृत-इंग्लिश कोश वापरलेला दिसतो. हा कोश सुटसुटीत आहे आणि तो वापरण्यात गैर काहीच नाही. मात्र अधून मधून मोनिअर-विल्यम्झ (१८९९, २००२) यांचा संस्कृत-इंग्लिश कोशही पाहावा. आपटे (अति-) सुलभीकरण कशा प्रकारे करतात याचे एक उदाहरण येथेच सापडते. मोनिअर-विल्यम्झ यांनी which excites thirst हे शब्द कंसात टाकलेले आहेत, आणि मला वाटते की कंसातले शब्द हा त्याचा *एक संदर्भगत* अर्थ आहे. म्हणजे असे की तो शब्द *विशेषत:* त्या संदर्भात वापरला जाई, मात्र त्या संदर्भाबाहेरही (म्हणजे तहानेच्या संदर्भाच्या पलीकडेही - कोणत्याही अन्नपदार्थाच्या संदर्भात) त्याचा वापर होणे शक्य होते. हा माझा कयास आहे. संस्कृत तज्ज्ञांनी याचे निराकरण करावे. 'दंश' या शब्दावरील या दोन कोशांच्या नोंदींचीही तुलना करावी.

संस्कृत ही भाषा आता नेहमीच्या वापरात नसल्याने तिला नव्या संदर्भात वापरण्याच्या शक्यता आता नाहीत म्हणून भूतकाळ वापरला आहे. वापरात असणाऱ्या भाषेचे कोश सतत नव्याने तयार करावे लागतात कारण भाषा किती वेगाने बदलते हे सांगता येत नसले तरी वापरणाऱ्यांच्या बोलण्यातून ती सतत आणि सूक्ष्मपणे बदलते आणि नवनवीन अर्थवलये निर्माण होत राहतात. डॉ० जॉन्सन यांचा अठराव्या शतकातील कोश आज कोणी इंग्लिशचा सर्वसामान्य वापराचा कोश म्हणून वापरणार नाही. खरे तर प्रत्येक पिढीने आपला स्वत:चा शब्दकोश निर्माण करायला हवा. शिवाय प्रमाण बोलीबरोबरच प्रमाणेतर बोलींचे कोशही आवश्यक आहेत. इतिहासाच्या सर्व टप्प्यांचा आणि सर्वच बोलींचा मिळून एखाद्या भाषेचा समग्रलक्ष्यी कोश हे कोशविद्येचे एक स्वप्नच म्हटले, पाहिजे.

मोनिअर-विल्यम्झ यांचा कोश अधिक महत्त्वाचा अशासाठी की तो भाषेच्या इतिहासाचीही दखल घेतो आणि वेगवेगळे अर्थ इतिहासाच्या वेगवेगळ्या टप्प्यांवर दर्शविण्याचा प्रयत्न करतो. खूप मोठा इतिहास असणारी संस्कृत भाषा स्थिर आहे असे तो मानत नाही. आपटे यांच्या कोशावरून या इतिहासाची आणि पर्यायाने भाषेच्या बदलाची कल्पना येणे अशक्य आहे. त्यामुळे नक्की कोणत्या टप्प्यावरील संस्कृत शब्दांचे अर्थ ते देतात याची आपल्याला खात्री देता येत नाही.

येथे आपटे यांच्या कोशाला कमी लेखण्याचा उद्देश नाही. हा कोश खरोखरीच वापरायला अगदी सुटसुटीत आहे. शाळा आणि महाविद्यालयीन बापरासाठी खास विद्यार्थ्यांच्या गरजा लक्षात घेऊन संक्षिप्त रूपात तयार केलेला हा एक उत्तम कोश आहे. मोनिअर-विल्यम्झ यांचा कोश अधिक संशोधकीय धर्तीचा, अधिक समग्रलक्ष्यी, तुलनात्मक भाषाशास्त्राच्या ऐतिहासिक तत्त्वांवर तयार केलेला, व्युत्पत्तिशास्त्रावर आधारलेला आहे. एकोणिसाव्या शतकात संस्कृतविषयीचे जे ज्ञान उपलब्ध झालेले होते त्याचा उपयोग यात पुरेपूर केलेला आहे.

**- मिलिंद मालशे**

चालू मुद्द्यावरील चर्चेत मला भर घालावीशी वाटते ती अशी :

१. हलायुधाने (इ०स० ९५०) 'अवदंश' ह्या शब्दासंबंधी पुढे दिल्याप्रमाणे स्पष्टीकरण दिले आहे -

चक्षणं, विदंशः, सन्धानं, रोचकः, सुरापानरुचिजनकचर्वणद्रव्यम्।

ही माहिती मला एका संकेतस्थळावर दिलेली आढळली. ग्रंथ पाहायला मिळालेला नाही.



अनुक्रमणिका

२. त्याखेरीज, मोनिअर-विल्यम्झपेक्षाही आधीच्या आणखी दोन शब्दकोशांमध्ये (जर्मन व इंग्लिश) जे स्पष्टीकरण मिळते ते असे —

(A) Bothlingk-Roth, 1868

1) Reizmittel (stimulant), Gewürz (Spice), Zukost.

2) *Meerrettig Nigh. Pr. (horseraddish)

(English translation from `Google translator')

(B) Wilson, [app.1830]

"a relish or what excites thirst"

सध्या मी मॉस्को येथे असल्यामुळे इतर सर्व संदर्भ पाहणे शक्य झालेले नाही.

**- मल्हार कुलकर्णी**

झक्कास! अवदंश ह्या शब्दाचा 'तो' अर्थ मला कुठल्या शब्दकोशातून गवसला त्याचा शोध श्री० मल्हार कुलकर्णींच्या उत्तरानं लावून दिला! अर्थात माझ्याकडील संदर्भात त्यांनी उल्लेख केलेला कोश नव्हताच. आधुनिक भिषगाचार्यांपैकी एकाशी गप्पा मारीत बसलो असताना त्यांनी अवदंशाचा उल्लेख करून त्याचं स्पष्टीकरण केलं होतं आणि ते मी माझ्या चिकटवहीत उतरवून घेतलं होतं. ती वही चाळत बसलो असताना ते टिपण अवचित दिसलं म्हणून ते मी चर्चामंडळापुढं मांडलं.

मात्र आता एक संदर्भ सापडला आहे तो सांगतो. माझ्या संग्रहात 'आयुर्वेदीय महाकोश अर्थात आयुर्वेदीय शब्दकोश' (महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ प्रकाशन, १९६८) आहे, त्याच्या पहिल्या खंडातील पान १०६वर पुढीलप्रमाणे नोंद आहे —

अवदंश-पु०, पानरुचिजननार्थं यद् व्यञ्जनं भक्ष्यते तत् (चचि० २४.१८),

पेयाची रुचि होण्यासाठी चटणी इ० तोंडी लावणे.

-क्षम-वि०, रुचिजनने समर्थः (चसू० २७.१४५)

रुचि उत्पन्न करण्यासारखे, रुचकर.

शिग्रुः पु०, (ध. ४.३९) शेवगा (गोडा).

[चचि० = चरक चिकित्सा; चसू० = चरकसूत्र; ध० = धन्वन्तरी]

(ह्या आयुर्वेदीय शब्दकोशात आधारभूत ग्रंथांची जी यादी दिली आहे तिच्यात हलायुधःचा उल्लेख आहे.)

तिखट पदार्थांच्या सेवनानं क्षुधातृष्णा चेतवल्या जातात असं वैद्यकशास्त्रात म्हटलेलं आहे, तेव्हा मद्यसेवनाचा जो उल्लेख आमच्या गप्पांमध्ये झाला तो केवळ संकल्पना स्पष्ट करून सांगण्याच्या प्रक्रियेचा भाग होता असं म्हणता येईल.

कसल्याही प्रकारचा अवदंश न घेताही आपल्या चर्चेला रंग भरत गेला ह्याचा आनंद होतो!

- विजय पाध्ये

### चर्चेत सहभागी झालेल्या मंडळींचा अल्प परिचय

**कुलकर्णी,** मल्हार : आयआयटी, पवई (मुंबई) येथे संस्कृतचे सहयोगी प्राध्यापक म्हणून कार्यरत. मा० राष्ट्रपतींकडून महर्षी बादरायण व्यास पुरस्कार देऊन विशेष सन्मान प्राप्त झालेले, पाणिनीय व्याकरणशास्त्राचे अभ्यासक. (ई-पत्ता: malharku@gmail.com)

**कुळकर्णी,** सलील : संगणकशास्त्र व सॉफ्टवेअर क्षेत्रात कार्यरत मराठी व संस्कृत भाषेचे अभ्यासक. (ई-पत्ता: saleelk@gmail.com)

**पाध्ये,** विजय : व्यावसायिक भाषांतरकर्मी, 'भाषा आणि जीवन'च्या संपादन-समितीचे सदस्य. (ई-पत्ता: v.wordsmith@gmail.com)

**मालशे,** (डॉ०) मिलिंद : आयआयटी, पवई (मुंबई) येथे इंग्रजीचे प्राध्यापक म्हणून कार्यरत भाषाविज्ञान व सौंदर्यशास्त्र विषयांचे अध्यापक, अभिजात भारतीय संगीताचे अभ्यासक व गायक. (ई-पत्ता: milindmalshe@yahoo.com ) ■

### 'गावकी'मधील बोली : २

'गावकी'मध्ये बोलीतले अनेक शब्द आलेले आहेत : सायमान (सामान), उलीसा (अल्प), मजा आलती (मजा आली होती), सुद (शुद्ध), गंधराव (गांधर्व), दाढ (लग्न ठरल्यावर किंवा झाल्यावर एखाद्या बाईचा नवरा मरण पावला तर ती दाढ), हांडवं (कंठाळी, गाढवाच्या किंवा घोड्याच्या पाठीवर टाकण्याची दोन बाजू असलेली पिशवी), फकस्त (फक्त), गोताई (पंचांनी केलेला दंड), पायधुणाळ (वधूचे पाय धुणे), डव्ह (डोह), हाडकी (ढोरं फाडण्याची जागा), हाडवळ (जिथं म्हाराची मेलेली माणसं पुरत ती जागा), गुडसे (नळ्या), इत्यादी.

वसंत आबाजी डहाके, सांस्कृतिक महाराष्ट्र भाग-१ संपा० मधु मंगेश कर्णिक, 'मराठी साहित्याची भाषा' मुंबई, २०११. पृ० १८८,

# वार्षिक सर्वसाधारण सभा

रंजना फडके

मराठी अभ्यास परिषदेची सतरावी सर्वसाधारण सभा रविवार दि० २९ जुलै २०१२ रोजी सकाळी १० वाजता 'शिक्षक भवन' येथे आयोजित करण्यात आली होती. अपुऱ्या गणसंख्येमुळे १५ मिनिटे सभा तहकूब करण्यात आली.

पंधरा मिनिटांनंतर दहा जणांच्या उपस्थितीत परिषदेचे अध्यक्ष प्रा० प्र०ना० परांजपे यांच्या परवानगीने सभेस प्रारंभ झाला. सर्वप्रथम परिषदेशी संबंधित असणाऱ्या गेल्या वर्षभरात कालवश झालेल्या व्यक्तींना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली. त्यानंतर मराठी अभ्यास परिषदेचे कार्यवाह आनंद काटीकर यांनी मागील वर्षाच्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त वाचून दाखविले. तसेच मागील वर्षाचे (२०११-१२) कार्यवृत्त सादर केले. त्यामध्ये मागील वर्षभरात झालेल्या कार्यकारी मंडळाच्या बैठका, केलेले उपक्रम, 'भाषा आणि जीवन'च्या प्रमुख संपादकपदी झालेली नवीन निवड इत्यादींची माहिती होती. या कार्यवृत्तास (सूचक - डॉ० रंजना फडके, अनुमोदक - श्रीधर देशपांडे) सभागृहाने संमती दिली.

त्यानंतर विजया चौधरी (कोषाध्यक्ष) यांनी लेखापरीक्षकाने तपासलेले २०११-१२ या आर्थिक वर्षाचे जमाखर्चपत्रक आणि ताळेबंद दोन्ही वाचून दाखविले. तसेच याप्रसंगी २०१२-१३ या आर्थिक वर्षाकरिता लेखापरीक्षक व कायदेविषयक सल्लागार याबाबतही विचार होऊन संमती घेण्यात आली. (सूचक - श्रीधर देशपांडे व अनुमोदक - सलील वाघ) याचबरोबर २०१२-२०१३ या आर्थिक वर्षाचा अर्थसंकल्प मंजूर होण्यासाठी सलील वाघ यांनी सूचक आणि मृणालिनी शहा यांनी अनुमोदक म्हणून ठरावास मान्यता दिली.

या ठरलेल्या औपचारिक बाबींनंतर अध्यक्षांच्या परवानगीने आयत्या वेळच्या विषयांवर चर्चा झाली. या चर्चेचे विशेष महत्त्व म्हणजे ज्येष्ठ समीक्षक मा० पुष्पा भावे यांनी आवर्जून उपस्थित राहून मराठी भाषेचा स्तर उंचावण्यासाठी काही मौलिक सूचना केल्या. ''आत्ममग्न, मूकबधिर, अशा मुलांना भाषा शिकवताना येणाऱ्या अडचणींबाबत काम करावे'' असेही त्या म्हणाल्या. परिषदेला ३० वर्षे पूर्ण होत आहेत. त्याचे औचित्य साधून 'निवडक भाषा व जीवन' असे पुस्तक काढावे - असे सर्वानुमते ठरले. सभांना मिळणारा प्रतिसाद वाढविण्यासाठी परिषदेच्या कार्यक्रमात सातत्य ठेवावे. व्याख्याने,



अनुक्रमणिका

एखाद्या लेखावर चर्चा व त्या अनुषंगाने तज्ज्ञांची मते असाही कार्यक्रम आयोजित करावा. विद्यार्थ्यांना/तरुणांना रुची वाटेल व उपयोगी पडेल अशा उपक्रमांचा विचार करावा, असेही मत व्यक्त केले गेले.

अध्यक्षीय समारोप करताना प्रा० प्र०ना० परांजपे म्हणाले, ''आत्यंतिक सुलभीकरणाच्या दृष्टिकोनामुळे मराठीचे महत्त्व कमी होत आहे. वाचन करणे कमी झाले आहे. तरुण परीक्षार्थी झाले आहेत. ही गंभीर बाब आहे. त्याकडे लक्ष देऊन परिषदेने कार्य केले पाहिजे.''

चहापानानंतर सभा संपली. ■

## स्वागत

(१) अनुवादमीमांसा : संपादक केशव तुपे, साक्षात प्रकाशन, औरंगाबाद, मूल्य पृष्ठसंख्या, २३२, मूल्य ₹ २३०/-

(२) 'निळे आकाश, हिरवी झाडे, काळी माती',रमेश पानसे, (ग्राममंगलचे शालेय भाषाशिक्षण) ग्राममंगल, पुणे, २०१२, पृष्ठसंख्या - १०३, देणगी मूल्य ₹ २००/-

(३) पालखी : सिसिलिया कार्व्हालो, मैत्रेय प्रकाशन, मुंबई, २०१२, पृष्ठसंख्या, २७१, मूल्य ₹ २७०/-

(४) 'पावसानंतरचे ऊन', (पुस्तिका) रमेश पानसे, प्राज्ञ पाठशाळा मंडळ, वाई, २०१२, पृष्ठसंख्या ३५, मूल्य ₹ ३०/-

(५) 'शब्दवेध', : डॉ० ब्रह्मानंद देशपांडे, कैलाश प्रकाशन, औरंगाबाद, २०११, पृष्ठसंख्या, ११२, मूल्य ₹ १००/-

(६) 'संतांच्या अम्लान कथा', प्रा० माधव ना० आचार्य, डायमंड प्रकाशन, पुणे, २०१२, पृष्ठसंख्या १२७, मूल्य ₹ १२५/-

(७) 'सृजनपंख', संपादक प्रा० स्वाती काटे, डॉ० पृथ्वीराज तौर, सायन प्रकाशन, पुणे, २०११, पृष्ठसंख्या १०४, मूल्य ₹ १२५/-

### इंग्रजी ग्रंथ

(१) 'द प्राइड ऑफ मुंबई', मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय, प्रदीप कर्णिक, डिंपल पब्लिकेशन, वसई रोड, २०१२, पृष्ठसंख्या २४७, मूल्य ₹ २६०/-





अनुक्रमणिका

# कर्मयोगी कानडे

कल्याण काळे

पुणे विद्यापीठाचे माजी मराठी विभागप्रमुख डॉ० मुकुंद श्रीनिवास कानडे हे दि० २५ जून २०१२ रोजी अनंतात विलीन झाले. अलीकडचे काही महिने ते अंथरुणाला खिळून होते आणि मृत्यूशी झुंज देत होते. पण अखेर काळापुढे त्यांचं काही चाललं नाही. तसं त्यांचं उभं आयुष्यच प्रतिकूल परिस्थिती झुंजण्यात गेलं. पत्नीचा दीर्घ आजार, एकुलत्या एक पुत्राचं मतिमंदत्व अशा दु:साध्य संकटांना त्यांना तोंड द्यावं लागलं. पण कुणापुढेही त्यांनी कधीही आपल्या दु:खाची वाच्यता केली नाही. स्थितप्रज्ञ वृत्तीने ते या दु:खाला सामोरे गेले.

डॉ० कानडे हे माझ्या पीएच०डी०च्या प्रबंधाचे मार्गदर्शक होते. पण मार्गदर्शक आणि विद्यार्थी यांच्यामध्ये जे अंतर एरवी आढळून येतं, तसं त्यांनी मला कधीही भासू दिलं नाही. ते स्वभावाने मितभाषी होते. सकृत दर्शनी गंभीर वाटले तरी हास्यविनोदाचे त्यांना वावडे नव्हते. कोणत्याही प्रसंगी त्यांनी आपला आवाज चढविला नाही. ते खूप सोशिक होते, तत्त्वनिष्ठ होते. त्यांच्या बाजूने ते अजातशत्रू होते. परंतु याचा अर्थ त्यांना कोणी शत्रू नव्हते, असा नाही. कारण ''मृगमीनसज्जनानां निष्कारण वैरिणो जगति'' असा जगाचा न्याय त्यांनाही लागू होता. पण एक गोष्ट खरी की, त्यांनी कोणाबद्दलही वैरभाव बाळगला नाही.

डॉ० कानडे हे पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागात शिकवत असत. एम०ए० झाल्यानंतर त्यांना लगेच साहाय्यक अधिव्याख्याता म्हणून विभागात नोकरी मिळाली. त्यानंतर अधिव्याख्याता, प्रपाठक, प्राध्यापक अशी उत्तरोत्तर वरची पदे त्यांना क्रमश: मिळत गेली. १९७६ ते १९९१ ते मराठी विभागाचे प्रमुख होते. १९९१ साली ते निवृत्त झाले. डॉ० कानडे हे अभ्यासू आणि विद्वान होते. ते मराठी विभागात भाषाशास्त्र, संतवाङ्मय, वाङ्मयेतिहास, संशोधनपद्धती शिकवत. ते आपल्या व्यवसायाशी शेवटपर्यंत प्रामाणिक राहिले. पुणे महानगरपालिकेने त्यांचा आदर्श शिक्षक म्हणून सत्कार केला होता.

विद्यापीठातील शिक्षकाला केवळ अध्यापनावरच समाधान मानून चालत नाही. त्याने आपल्या आवडीच्या विषयावर संशोधन करून त्यावर ग्रंथलेखन करावे अशीही त्याच्याकडून अपेक्षा असते. डॉ० कानडे यांना मराठीतील नाट्यवाङ्मय, संतवाङ्मय,

भाषाशास्त्र, संशोधन, वाङ्मयेतिहास या विषयांत विशेष रस होता. त्यांनी या विषयांवर विपुल नसलं तरी लक्षवेधक लेखन केलेलं आहे. त्यांनी एकूण २६ ग्रंथ लिहिले आहेत. त्यातील काही संपादित आहेत. त्यापैकी अनेक ग्रंथांना शासकीय पुरस्कारही मिळालेले आहेत. 'कालचे नाटककार', 'प्रयोगक्षम मराठी नाटके', 'मराठी नाट्य परिषद : इतिहास आणि कार्य', 'मराठी रंगभूमीचा उषःकाल', 'ज्ञानेश्वरी टिपण', 'संत चोखामेळा', 'संतांचि हे भेटी', 'काही संत - काही शाहीर', 'भाऊसाहेबांची बखर', 'हरिवंशाची बखर', 'मराठी संतवाङ्मय संदर्भ-सूची', 'भारत इतिहास संशोधक मंडळ पत्रिका सूची', 'मराठी शब्द समीक्षा', 'मराठीचा भाषिक अभ्यास', 'गाभारा' इ० ग्रंथांवरून त्यांच्या चौफेर व्यासंगाची कल्पना येईल. त्यांचा पीएच०डी०चा प्रबंध 'दासबोधाचा भाषाशास्त्रीय अभ्यास' असा होता. नुकताच त्याचा काही भाग कोशरूपाने प्रसिद्ध झाला आहे.

पुणे विद्यापीठाच्या मराठी विभागाचे प्रमुख असताना कानडे सरांनी अनेक शैक्षणिक उपक्रम राबविले. व्याकरणावरील व्याख्यानमाला, संशोधन व्याख्यानमाला, मराठीचे अध्यापन, साहित्य आणि सामाजिक शास्त्रे या विषयावरील व्याख्यानमाला निरनिराळ्या विषयांवरची अनेक चर्चासत्रे इत्यादी उपक्रम हे त्यांपैकी काही होत.

डॉ० कानडे यांची ज्ञानेश्वरांवर फार भक्ती होती. ज्ञानेश्वरांच्या नावे विद्यापीठात एक अध्यासन स्थापावे अशी त्यांची फार इच्छा होती. पण त्यासाठी सात लाख रुपयांची व्यवस्था करणे आवश्यक होते. तेव्हा कानडेसरांनी संत ज्ञानेश्वर अध्यासनासाठी निधी उभा करण्यासाठी संकल्प सोडला. अगदी एक रुपयापासून मिळेल ती रक्कम ते स्वीकारू लागले. काही लोकांना हे हास्यास्पद वाटे. खारीने सेतू बांधण्यासारखे ते कठीण वाटत होते; पण कानडेसरांनी चिकाटी सोडली नाही. त्यांनी श्री० अनंतराव आठवले यांना आवाहन केले. त्यांनी पुणे आणि मुंबई येथे कीर्तनप्रवचनांद्वारे श्रोत्यांना आवाहन केले. त्यामुळे केवळ पंधरा दिवसात चार लाखांची रक्कम जमा झाली. त्यानंतर लगेचच पुणे विद्यापीठात ज्ञानदेव अध्यासनाची स्थापना झाली. ज्ञानदेव अध्यासनाची स्थापना ही कानडेसरांच्या कारकीर्दीतील महत्त्वाची घटना होती.

कानडेसर १९९१ साली विद्यापीठाच्या सेवेतून निवृत्त झाले. त्यानंतर स्वस्थ न बसता त्यांनी श्री० रा०शं० नगरकर यांच्या सहकार्याने मराठीतील प्रमुख संतांच्या ग्रंथांचे शब्दार्थ संदर्भ कोश निर्माण करण्याचा प्रकल्प सुरू केला. १९९२ ते २००९ पर्यंत सतत अठरा वर्षे हे दोघे कोशकार्यात गुंतलेले होते. नोंदींची हजारो कार्डे तयार झाली, त्यांच्यावर चर्चा केल्या आणि हजारो शब्दांच्या नोंदी लिहिल्या. अशा या शिस्तबद्ध प्रयत्नातून एकामागून एक संतकोश आकाराला आले. या काळात या दोघांनी (१) श्री तुकाराम गाथा : शब्दार्थ संदर्भ कोश, (२) श्री एकनाथी भागवत : शब्दार्थ संदर्भ कोश, (३) नामदेव गाथा : शब्दार्थसंदर्भ कोश, (४) श्री ज्ञानदेव गाथा : शब्दार्थ संदर्भ

कोश आणि (५) (दासबोध वगळून) 'श्री समर्थ रामदास वाङ्मय शब्दार्थ संदर्भ कोश' असे कोश निर्माण केले. 'दासबोध शब्दार्थ संदर्भ कोश' हा एकट्या कानडेसरांचा होता. या कोशकार्याच्या जोडीला त्या दोघांनी मिळून 'ज्ञानदेवांचा सार्थ चिकित्सक गाथा' आणि 'नामदेवांचा सार्थ चिकित्सक गाथा' हे दोन ग्रंथ संशोधनपूर्वक चिकित्सा करून सिद्ध केले. या दोन्ही संतांच्या गाथांमध्ये इतरांच्या अनेक अभंगांची सरमिसळ झाली आहे, असे सर्वच अभ्यासक सांगत आले आहेत. पण नेमके कोणते अभंग प्रक्षिप्त आहेत, कोणते मूळचे आहेत हे आतापर्यंत कोणीच निश्चितपणे सांगत नव्हते. या दोघांनी ठाण मांडून या विषयाचा पिच्छा पुरवला आणि मोठ्या जिद्दीने ते काम शास्त्रशुद्ध निकषांच्या आधारे पूर्ण केले. कानडेसरांची ही सर्व वाङ्मयसेवा ध्यानात घेऊन महाराष्ट्र साहित्य परिषदेने त्यांना जीवनगौरव पुरस्कार देऊन त्यांचा सत्कार केला.

कानडेसरांच्या आणखी एका महत्त्वाच्या कार्याची येथे दखल घेतलीच पाहिजे. त्यांनी के०ई०एम० हॉस्पिटल, एस०एन०डी०टी० महाविद्यालय, फर्ग्युसन महाविद्यालय, स० प० महाविद्यालयातील सोनोपंत दांडेकर अध्यासन या संस्थांना एकहाती मोठ्या रकमांच्या देणग्या दिल्या आहेत. तसेच 'कानडे मित्रमंडळ' ही संस्था स्थापन करून तिच्यामार्फत दरवर्षीच्या उत्कृष्ट प्रबंधाला दहा हजार रुपयांचे प्रकाशन अनुदान, उत्कृष्ट लेखकाला दहा हजार रुपयांचा पुरस्कार, नाटक आणि संतवाङ्मय या क्षेत्रातील उत्कृष्ट ग्रंथाला आलटून पालटून पुरस्कार, असे पुरस्कार कित्येक वर्षे दिले. विशेष म्हणजे पदरमोड करून चालवलेल्या या उपक्रमातील स्वत:च्या मुख्य भूमिकेची त्यांनी एका शब्दानेही कुठे वाच्यता केली नाही.

अशा एका सत्प्रवृत्त, व्यासंगी व कर्मयोगी शिक्षकाला आपण कायमचेच मुकलो आहोत. त्यांच्या निधनाने जाणवणारी पोकळी कधीच भरून न येणारी आहे.

■

**क्षमस्व !**

'भाषा आणि जीवन' (वर्ष ३०, अंक ३)मध्ये पृ० ५८ वरील 'श्रद्धांजली'च्या वृत्तात झाडीबोलीचे अभ्यासक द.सा. बोरकर यांच्याऐवजी झाडीबोलीचे अभ्यासक डॉ० हरिश्चंद्र बोरकर यांच्या नावाचा चुकीचा उल्लेख करण्यात आला आहे. त्याबद्दल आम्ही दिलगीर आहोत.

- संपादक

# सॉम्निलोकंट

मा० संपादक,

भाषा आणि जीवन

महोदय,

संदर्भ : 'भाषा आणि जीवन', पावसाळा २०१२, मधील अंकात पान क्र. ६०वर 'सॉम्निलोकंट'विषयी मते-मतांतरे आलेली आहेत. ह्यासंदर्भात महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने प्रकाशित केलेल्या मराठी शब्दकोशांच्या पहिल्या खंडात पान क्र० ४६० वर उसणणे - बरळणे तसेच उसणून उठणे, उसणावणे-झोपेतून ओरडत उठणे तर पान क्र० ५१९वर ओष्णावणे - ओष्णणे - झोपेत बोलणे - बरळणे, बडबडणे, ओसणणे, जाबडणे असे अर्थ दिलेले आहेत. (संस्कृत, उत्स्वप्न) माझ्यामते 'निद्राचर'पेक्षा 'निद्राभाष' हा अधिक सुटसुटीत पारिभाषिक शब्द होऊ शकेल. निद्रानाश आणि चलभाष असे दोन शब्द मराठीत आहेतच. त्यामुळे उच्चारसौकर्यात अडचण येणार नाही असे वाटते.

**अशोक विष्णुपंत थोरात,** निवृत्त अधिव्याख्याता, शासकीय विदर्भ ज्ञानविज्ञान संस्था, अमरावती, चलभाष : 99600 48878 ■

प्रतिसाद - २

# वर्ष ३०, अंक ३ विषयी

**डॉ० रावसाहेब काळे**

स० न०वि०वि०

'भाषा आणि जीवन'चा (वर्ष ३०/अंक३/पावसाळा २०१२) अंक मिळाला. मात्र त्यातील ३४-३५, ३८,३९,४२-४३, ४६-४७ ही पाने कोरी आहेत. अन्य सर्व लेख वाचले. आवडले. अभिव्यक्तीच्या नव्या वाटा...' ह्या आनंद काटीकर यांच्या लेखावरून वऱ्हाड/विदर्भ यावर एक संकेत स्थळ काढता येऊ शकते. त्यात वऱ्हाडचा इतिहास, भूगोल, लिखित साहित्य, लोकसाहित्य, संस्कृती, वऱ्हाडी भाषा इ० माहिती देता येऊ शकते, असे वाटले. 'भाषाच ही निकामी?' ह्या नीलिमा गुंडी यांच्या लेखातून कवितेची वीण-तिची संरचना कळली. संज्ञाप्रवाहाचे सूत्र, नादसंघटनेचे सूत्र, साहचर्याचे सूत्र, प्रतिमांचे सूत्र आणि स्वप्नसरणीचे सूत्र अशी वेगवेगळी सूत्रे काव्याच्या संरचनेमागे असतात, हे प्रथमच वाचण्यात आले. ■

# अभिजात भाषा : एक भिन्न दृष्टिकोन

नीळकंठ ·

संदर्भ : 'मराठी : एक अभिजात भाषा' या विषयावर मराठी अभ्यास परिषदेने १ २०१२ रोजी आयोजित केलेला परिसंवाद.

या परिसंवादास मी हजर होतो. या परिसंवादात तीन अभ्यासकांनी त्यांचे वि मांडले. सर्वसाधारणपणे तीनही व्याख्यांनाचा भर एकसारखाच होता. त्या सभेमधून दु:खित अंत:करणाने बाहेर पडलो. एखाद्या भारतीय भाषेला 'अभिजात भाषा' म्ह मान्यता प्रदान करण्यासंदर्भात केंद्र सरकार जी कृती करते, त्या कृतीचे स्वरूप हे मा खेदाचे एक कारण होते. 'अभिजात भाषा' म्हणून एखाद्या भाषेला मान्यता प्र करावयाची म्हणजे अनुदानापोटी केवळ एक भलीलठ्ठ रक्कम मंजूर करून टाकायची, एव काय ते पाऊल केंद्र सरकार या संदर्भात उचलते. 'तमीळ' या भाषेला अभिजात भा दर्जा प्रथम प्रदान केला गेला. त्या वेळी केंद्र सरकारने ३०० कोटी रुपयांइतकी भरभक रक्कम मंजूर केली होती, असे त्या परिसंवादादरम्यान सांगितले गेले (३०० कोटी रुप हे अनुदान दरवर्षी मिळणार होते की ते एक रकमी एकदाच दिले गेले याबाबत खुलासा नव्हता). या रकमेपैकी जवळपास १० टक्के रक्कम ही जागतिक तमीळ परिषदे आयोजनार्थ खर्ची पडली, असेही सांगण्यात आले. उद्या मराठी भाषेसाठीही अ अनुदान केंद्र सरकारतर्फे दिले गेले तर मराठी भाषेसंदर्भात जिल्हास्तरीय संमेलने परिषदा आयोजित करण्यासाठी त्यापैकी काही रकमेचा विनियोग करता येईल, अ सूचनावजा प्रस्ताव वक्त्यांपैकी एकाने मांडल्याने तर माझ्या खेदात भरत पडली.

माझ्या मते एखाद्या विशिष्ट भाषेला अभिजात भाषेचा दर्जा प्रदान करण्या धोरणाला सरकारने तिलांजली द्यायला हवी. हा सगळाच विषय आणि चर्चा विद्वानांचा आणि संशोधकांचा आहे. सरकारने त्यात पडू नये. अभिजाततेचा एखाद्या भाषेला प्रदान करण्याबरोबरच विशेष अनुदानाचेही एक पिल्लू सोडून देण्य आल्यामुळेच केवळ या चित्रात सरकारचा प्रवेश होण्यास वाव मिळालेला आहे.

या संदर्भात केवळ केंद्र सरकारच नव्हे; तर राज्य सरकारांनाही अतिशय सकारात भूमिका बजावण्यास अवकाश आहे. आपल्या देशातील विविध भाषांमधील लि दस्तऐवजांचे संगोपन व संरक्षण करणे हे एक मोठेच काम आहे. आपल्या देशात काम सरकारने आपल्या अंगावर घेण्याखेरीज गत्यंतर नाही. छापील पुस्तके अ हस्तलिखिते वा भूर्जपत्रासारख्या साधनांवरील हस्तलिखितांच्या स्वरूपात अथवा ताम्र

वा शिलालेखांच्या स्वरूपात आपल्या देशात असे साहित्य विपुल प्रमाणात उपलब्ध आहे. आपल्या देशातील नानाविध भाषांचा उगम आणि विकास यांचा अभ्यास आधारसाहित्य म्हणून उपयुक्त ठरू शकेल. अभिजात भाषा व तिची वैशिष्ट्ये हा मग विद्वत्‌चर्चेचा आणि अशा चर्चेअंती निर्णय घेतला जाण्याचा विषय बनेल.

आपल्या देशातील विविध भाषांमध्ये लिहिले गेलेले ग्रंथ, हस्तलिखिते, कोरीव लेख यांचे डिजिटायझेशन करण्यासाठी केंद्र सरकारने दरवर्षी चांगल्या भरभक्कम निधीची तरतूद करावी, असे या संदर्भात सुचवावेसे मला वाटते. जुन्या दस्तऐवजांचे असे डिजिटायझेशन करणे हे अतिशय वेळखाऊ आणि तितकेच खर्चिक काम होय. संस्कत भाषेतील लिखित साहित्याचे डिजिटायझेशन करण्याचे काम केंद्र सरकारने हाती घेतलेले आहे, असे कळते. आता संस्कृत ही आपल्या देशातील एकाही राज्याची अधिकृत अशी राजभाषा नाही. तेव्हा, संस्कृतच्याच धर्तीवर, त्या त्या राज्याच्या अधिकृत भाषेमध्ये लिहिल्या गेलेल्या दस्तऐवजांचे डिजिटायझेशन करण्यासाठी केंद्र सरकारने देशातील राज्यांना खास अनुदान अदा करावे. परंतु, त्याच वेळी केंद्र सरकारकडून अनुदानापोटी मिळालेल्या रकमेइतकीच रक्कम तरी त्या त्या राज्यानेही स्वत:च्या उत्पन्नामधून या कामासाठी उपलब्ध करून द्यावी, अशी अट मात्र घातली गेली पाहिजे. अर्थात, राज्यांनी अधिक रक्कम उपलब्ध करून दिली तर चांगलेच.

आपल्या देशाचा इतिहास आणि संस्कृती, आपल्या देशातील विविध भाषिक तसेच सांस्कृतिक विभागांचा इतिहास तसेच आपल्या या भूमीतील नानाविध भाषांच्या संवर्धनाच्या दृष्टीने हे कार्य किती महत्त्वाचे ठरेल, हे वेगळे सांगण्याची गरज नाही. राज्योराज्यीची सरकारी वस्तुसंग्रहालये तसेच पुराभिलेखागारांमधून आजमितीस अक्षरश: अगणित दस्तऐवजांचा ठेवा पडून आहे. केवळ इतकेच नाही तर अनेक खासगी संस्था तसेच व्यक्तींच्या वैयक्तिक संग्रहांमध्येही अशाच प्रकारचे मौल्यवान दस्तऐवज किती असतील त्याची तर गणतीच नाही. फार लांब जायचीही गरज नाही. पुण्यातील पेशवे दप्तर, भारत इतिहास संशोधक मंडळ तसेच इतिहासाचार्य राजवाड्यांनी धुळे येथे स्थापन केलेले संशोधन मंदिर यांसारख्या ठिकाणी अगणित दस्तऐवज आजही बासनांत गुंडाळून ठेवलेले आपल्याला आढळतील. हे सगळे रुमाल सोडून बघण्याचे कष्टही आजतागायत फारसे कोणी घेतलेले नाहीत. नागपूर, औरंगाबाद, अमरावती अशा अन्य ठिकाणी उपलब्ध होऊ शकणारे साहित्य विचारात घेतले तर हा साधनांचा पसारा अधिकच विस्तारेल.

प्राचीन साहित्याचे संगोपन करण्यापुरताच हा विषय मर्यादित नाही. आपल्या देशात मुद्रणकलेचा शोध १९व्या शतकात लागल्यापासून इथे प्रकाशित झालेल्या ग्रंथांपैकी किती ग्रंथ आपल्याला आज सापडू शकतील? आज एकही प्रत कोठेही मिळू न शकणाऱ्या

अशा किती तरी ग्रंथांची नावे मराठीतील अग्रगण्य अभ्यासक-संशोधक आठवून सांगू शकतील. त्यामुळे, डिजिटायझेशन करण्याचा एक पद्धतशीर आणि भव्य प्रकल्पच उभारला जाण्याची आज निकड आहे. अशा प्रकारचा महत्त्वाकांक्षी प्रकल्प शासनाच्या साहाय्याखेरीज उभा राहणे आपल्या देशात दुरापास्त ठरते.

प्राचीन दस्तऐवजांचे अशा प्रकारे एकदा का डिजिटायझेशन झाले की ते कोणालाही अभ्यासासाठी सुलभपणे उपलब्ध होऊ शकतील. संशोधन हे अशा इच्छुक अभ्यासक-संशोधकांचेच काम होय, सरकारचे नव्हे. विविध ज्ञानशाखांच्या विशेष अभ्यासासाठीच ठिकठिकाणी स्थापन करण्यात आलेली अध्यासने, विद्यापीठे तसेच अन्य संशोधन संस्थांमध्ये कार्यरत असणारे प्राध्यापक, संशोधक, अभ्यासक, विद्यार्थीगण... अशा सगळ्यांचीच त्यामुळे किती मोठी सोय होऊ शकेल. किंबहुना, १ मे रोजीच्या परिसंवादात वक्त्यांपैकी एकाने नेमक्या याच संदर्भातील ज्या काही शक्यतांचा ऊहापोह केलेला होता त्या शक्यता वास्तवात उतरण्यासाठी डिजिटायझेशन ही पूर्वअट ठरते.

आता, अगदी प्राचीन अशी काही हस्तलिखिते आज उघडून-उलगडून वाचण्याच्याही अवस्थेत नसतील, हे मान्य. अशा परिस्थितीत, निदान पहिली दोन ते तीन वर्षे तरी, १९व्या शतकापूर्वीच्या दस्तऐवजांचेच काय ते डिजिटायझेशन आपण हाती घ्यावे असे मी सुचवीन. पुढे या कामाची कक्षा नंतरच्या सर्व साहित्यापर्यंत विस्तारता येईल.

आमच्या भाषेला अभिजात भाषेचा दर्जा प्रदान करण्यात येऊन त्या अंतर्गत मिळणारे अनुदान आम्हांला मिळावे यासाठी चळवळ करण्यापेक्षाही, केंद्र सरकार आणि राज्य सरकारांनी संबंधित धोरणात बदल घडवून आणावा अशी जाहीर मागणी सर्व अभ्यासक-संशोधक-विद्वानांनी तसेच मराठी अभ्यास परिषदेनेही केली पाहिजे, असे मला सुचवावेसे वाटते. मराठी अभ्यास परिषद आणि साहित्य परिषदेनेही अन्य महाराष्ट्र राज्यातील समकक्ष भगिनी संस्थांशी संपर्क साधून अशा प्रकारची एकमुखी मागणी केंद्र सरकारपुढे मांडली जावी यासाठी सक्रिय बनण्याची गरज आहे. एकोप्याने केलेल्या अशा प्रयत्नांमधूनच काही तरी हाती लागू शकेल.

भारतीय अर्थविज्ञानवर्धिनी, सेनापती बापट मार्ग, पुणे 416 016.

■

लेखक परिचय -

■ **आळवेकर,** एकनाथ : एम०ए०, एम०फिल०, पीएच०डी०, दत्ताजीराव कदम, ए०एस०सी० महाविद्यालय, इचलकरंजी येथे मराठीचे अध्यापन, 'गिरिजा कीर : व्यक्ती आणि वाङ्मय' हा ग्रंथ प्रकाशित. विविध नियतकालिकांमधून लेखन. शिवाजी विद्यापीठाच्या अभ्यासमंडळाचे सदस्य.
टपाल-पत्ता : प्लॉट क्र. 40 , बाळासाहेब इंगवले पार्क, फुलेवाडी जकातनाका, फुलेवाडी, कोल्हापूर, 416 010 चलभाष : 94232 83703

■ **काजरेकर,** गोविंद : एम०ए०,बी०एड०; सेट, पीएच०डी०, गोगटे-वाळके, महाविद्यालय, बांदा (ता० सावंतवाडी) येथे मराठी विभागप्रमुख 'उरल्यासुरल्या जगण्याचे रिमिक्स' हा काव्यसंग्रह प्रकाशित. त्यास अनेक पुरस्कार प्राप्त. संशोधन, संपादनपर लेखन. मुंबई विद्यापीठाच्या अभ्यासमंडळाचे सदस्य.
टपाल-पत्ता : मु०पो० तळवडे, ता० सावंतवाडी, जि० सिंधुदुर्ग 416 529
चलभाष : 9422 63355; ई-पत्ता : ggkajrekar@rediffmail.com

■ **काळबांडे,** अनिल : एम०ए० नेट, मिलिंद महाविद्यालय, मुळावा, (ता० उमरखेड, जि० यवतमाळ) येथे मराठी विभागप्रमुख पीएच०डी०साठी संशोधन चालू.
टपाल-पत्ता : आकांक्षा निवास, कारखाना कॉलनी, उमरखेड, जि. यवतमाळ 445 206, चलभाष : 095279 41841 / 094224 52450

■ **काळे,** कल्याण : एम०ए०, पीएच०डी०, डेक्कन विद्यापीठात १६ वर्षे अध्यापन, निवृत्त प्राध्यापक, मराठी विभाग पुणे विद्यापीठ, अनेक वर्षे 'भाषा आणि जीवन'चे संपादक, भाषाविज्ञानषयक ४ आणि संतवाङ्मय-अभ्यासविषयक ६ पुस्तके प्रकाशित. १५० शोधनिबंध सादर, बायबलच्या जुन्या कराराच्या भाषांतर कार्यासाठी समन्वयक.
टपाल-पत्ता : ए-5 प्रज्ञानगड, दुसरा मजला, 19-3-3, नवश्या मारुती गल्ली, वीट भट्टी, सिंहगडरस्ता, पुणे 411 030. स्थिरभाष : (020) 2425 3136

■ **काळे,** रावसाहेब : एम०ए० पीएच०डी०, 'समकालीन ग्रामीण साहित्य', डॉ० विठ्ठल वाघ गौरवग्रंथाचे संपादन, वऱ्हाडी बोली संशोधन केंद्र (लोणी)चे अध्यक्ष.
टपाल-पत्ता : मु०लोणी, पो० रिधोरा, ता० बाळापूर, जि० अकोला 443 002.
ई-पत्ता : raosaheb_kale@rediffmailcom; चलभाष : 099231 93262

■ **किरवले,** कृष्णा : एम०ए० पीएच०डी०, संचालक, डॉ० बाबासाहेब आंबेडकर अध्यासन, शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर, 'आंबेडकरी शाहिरी : एक शोध' हे पुस्तक प्रसिद्ध.
टपाल-पत्ता : शिक्षक निवास क्र० A1, शिवाजी विद्यापीठ परिसर, कोल्हापूर
चलभाष : 098226 61879



अनुक्रमणिका

■ **कोळी,** संजयकुमार : एम०ए०, पीएच०डी०, फर्ग्युसन महाविद्यालयात अध्यापन
टपाल-पत्ता : मराठी विभाग, फर्ग्युसन महाविद्यालय, पुणे 411 004.

■ **गुंडी,** नीलिमा : एम०ए०, पीएच०डी०, डी०एच०ई०, स०प० कनिष्ठ महाविद्यालय (पुणे) निवृत्त उपप्राचार्य, कविता, ललित, वैचारिक, समीक्षा, बालसाहित्य व संपादन या प्रकारचे लेखन. स्वतंत्र १५ पुस्तके प्रकाशित आणि सहा पुस्तकांसाठी संपादन सहकार्य. लेखनासाठी दोन राज्यपुरस्कारांसह एकूण आठ पुरस्कार प्राप्त.
संपर्क : पाहा : मलपृष्ठ २ वरील संपादकीय पत्रव्यवहार.

■ **चौधरी,** विजया : एम०ए०, पंजाब नॅशनल बँकेच्या अधिकारपदावरून स्वेच्छानिवृत्त, 'स्त्रीसाहित्याचा मागोवा.' (खंड क्र० ३) मध्ये लेखन सहभाग.
टपाल-पत्ता : इ 502, गार्डन व्ह्यू, राधिका सोसायटी, पर्वतीनगर, सिंहगड रस्ता, पुणे 411 030 स्थिरभाष : (020) 2425 0559,
ई पत्ता : vijayachaudhari@gmail.com चलभाष : 099236 71820

■ **जाखडे,** अरुण : लेखक, संपादक, प्रकाशक. 'पद्मगंधा' ह्या वाङ्मयीन प्रकाशन-संस्थेचे संस्थापक व संचालक, आठ पुस्तके प्रकाशित, राज्य सरकारचे व इतर संस्थांचे विविध पुरस्कार प्राप्त, मराठी प्रकाशक परिषदेचे कार्याध्यक्ष.
टपाल-पत्ता : पद्मगंधा प्रकाशन, 1966, ताराभुवन, माडीवाले कॉलनी, सदाशिव पेठ, पुणे 411 030. चलभाष : 98500 86423

■ **तुपे,** केशव : एम०ए०, पीएच०डी०, सहयोगी प्राध्यापक, पदव्युत्तर मराठी विभाग, शासकीय विदर्भ ज्ञानविज्ञानसंस्था, अमरावती 444 604. 'साहित्याचे सांस्कृतिक संचित', 'साहित्य, सर्जन आणि संदर्भ', 'माध्यमांची भाषा आणि लेखनकौशल्ये' व 'अनुवादमीमांसा' (संपादित) ही पुस्तके प्रकाशित. संशोधनप्रकल्पात सहभाग.
चलभाष : 094202 85878

■ **देवरे,** सुधीर : एम०ए०,पीएच०डी०, भाषा, कला, लोकजीवन व लोकवाङ्मयाचे अभ्यासक, अहिराणी भाषा संशोधक, 'ढोल' या अहिराणी नियतकालिकाचे संपादक सदस्य, महाराष्ट्र राज्य लोकसाहित्य समिती. 'दोन काव्यसंग्रह, 'पंख गळून गेले तरी' हा आत्मकथन व 'अहिराणी लोकपरंपरा', कला आणि संस्कृती : एक समन्वय' अशी ग्रंथसंपदा, लेखनाबद्दल तीन पुरस्कार प्राप्त.
टपाल-पत्ता : सायास, टेलिफोन कॉलनी, सटाणा, जि० नाशिक 423 301.
चलभाष : 094222 70837 ई-पत्ता : sudhirdeore2g@rediffmail.com

■ **बागुल,** फुला : एम०ए०,बी०एड०, सेट, पीएच०डी०, तीन काव्यसंग्रह, दोन ग्रंथ प्रकाशित. साहाय्यक प्राध्यापक, एस०पी०डी०एम० कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, शिरपूर, जि० धुळे.
टपाल-पत्ता : 32, गणेश कॉलनी, शिरपूर, जि० धुळे. चलभाष : 098229 34874

■ **मेहता,** कलिका : एम०ए०,पीएच०डी०, प्राचार्य, पश्चिम विभागीय भाषा केंद्र, पुणे. अनेक संशोधन प्रकल्पांत सहभाग.
टपाल-पत्ता : सी-7, सूर्यप्रकाश अपार्टमेंट, मार्केटयार्ड, पुणे 411 037.
चलभाष : 098812 50083

अनुक्रमणिका

